श्री

# संगीत नंद-कुमार

हें नाटक

विठ्ठल सीताराम गुर्जर

यांनीं लिहिलें

प्रथमावृत्ति

१०.२५

किंमत एक रुपया



प्रिय बंधु

कै. श्री. राम गणेश गडकरी

यांच्या प्रेमळ

आत्म्यास

# प्रस्तावना

**श्रीकृष्णा**सारखी लोकोत्तर, त्रिभुवनवंद्य विभूति भारतवर्षाच्या काय, परंतु जगाच्या इतिहासांत आजपर्यंत एकही झाली नाहीं. **श्रीकृष्णा**च्या हातून जगन्मंगलाच्या ज्या दिव्य मंदिराची उभारणी झाली त्याचा पाया, तो **'नंद-कुमार'** असतां कसा घातला गेला, याविषयींची कल्पना प्रस्तुत नाटकांत ग्रथित केली आहे.

प्रस्तुत नाटक लिहितांना, माझे प्रिय बंधु, सुप्रसिद्ध नाट्याचार्य कै. श्री. **राम गणेश गडकरी** यांनी केलेल्या अनेक अमूल्य सूचनांचा मला अत्यंत उपयोग झाला आहे. माझ्या प्रिय बंधूच्या मजवरील अखंड ऋणांत हीहि एक भर पडली आहे ! नाटकांतील पद्यांच्या चाली मुख्यतः सुप्रसिद्ध गायनाचार्य कै. श्री. **भास्करबुवा बखले,** यांचे पट्टशिष्य श्री.**कृष्णराव फुलंब्रीकर (मास्टर कृष्णराव)** यांनीं दिल्या असून त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. उत्कृष्ट साजसजावटीनें आणि विशेष परिश्रमानें नाटक रंगभूमीवर आणण्याचें सर्व श्रेय **गंधर्व नाटक मंडळी**चे मालक श्री. **नारायणराव राजहंस (बालगंधर्व)** यांजकडेच मुख्यतः असून, **गंधर्व नाटक मंडळीं**तील सर्व नटांचें या कामीं फार साहाय्य झालें आहे. याबद्दल आणि पुस्तकांतील चित्रांकरतां नाटकांतील प्रसंगांचे फोटो दिल्याबद्दल श्री.**बालगंधर्व** आणि **गंधर्व नाटक मंडळी** यांचा मी अत्यंत ऋणी आहें. नाटकांतील पात्रांच्या भारतकालीन वेषाची परिकल्पना कोल्हापुरच्या सुप्रसिद्ध '**महाराष्ट्र फिल्म कंपनी**'चे चालक श्री. **बाबूराव पेंटर** यांनीं दिली असून, पोषाकांच्या भव्य उठावदारपणाचे सर्व यश केवळ त्यांना आहे. श्री.**बाबुराव** यांचे याबद्दल आभार मानावे तेवढे थोडे आहेत. त्याप्रमाणेंच, नाटक लिहितांना, रंगभूमीवर आणतांना व त्याचे पुस्तक छापतांना, ज्या ज्या मित्रांचे मला प्रेमपूर्वक साहाय्य झालें, त्यांचाही मी फार आभारी आहे.

मुंबई, रविवार, ता. १८ जानेवारी,
सन १९२५

**विठ्ठल सीताराम गुर्जर**

---

श्री

# संगीत नंद-कुमार

## अंक पहिला

[ सागरामध्यें श्रीशेषशायी भगवान् विश्रांति घेत आहेत; देवतांचें स्तवन.]

**मंगलाचरण**

[ राग–भूप; ताल–त्रिताल; चाल–लकछब सांवरिया० ]

**सविनय सांजलि याचीं । झडकरि त्यजा प्रभुवरा ! शयना ॥ ध्रु० ॥ घोर असुर–पीडा–भर होतां हंबरते विश्वंभरा । सुखि तरि कसे मिटितसां नयनां ? ॥ १ ॥ एक आर्त भक्तास्तव घेतां नव अवतार दयाघना ! । संप्रति रुचे शयन !—हा नय ना ? ॥ २ ॥**

---

## प्रवेश पहिला

[ यमुनातीरावरील कुंजवन. राधा व चंद्रिका प्रवेश करतात. ]

**चंद्रिका**—बागवा ! राधे, बोलण्याच्या नादांत तूं मला इकडेच आणलंस ! कुंजेश्वराच्या दर्शनाला म्हणून निघालीस आणि आलीस इकडे !

**राधा**—मग दुसरीकडे ग कुठं जायचं, चंद्रिके ? कुंजेश्वराचं दर्शन घ्यायचं म्हणजे इकडेच, या कुंजमंदिरांत, श्रीकृष्णाच्या कुंजवनांतील या कुंजमंदिरांतच यावं लागतं हो ! वेडी नाहीं तर !

**चंद्रिका**—खरंच वेडी मी ! अगदीं सातवेडी ! मला वेडीला काय ठाऊक, कीं तुझा कुंजेश्वर म्हणजे या कुंजमंदिराचा ईश्वर म्हणून ? इतर सातपांचजणीं-

सारखं मलाहि आपलं वाटलं, कीं कुंजेश्वर म्हणजे कुंजवनाच्या तोंडाशींच असलेला शंकर असेल म्हणून ! छे, राधे, तूं आपली मुकाट्यानं घरीं चल !

**राधा**—चंद्रिके, जायचंच जर असेल तर तूं आपली एकटी जा ! मी नाहीं इतक्यांत येत.

**चंद्रिका**—राधे, मीही पण पक्की आहे बरं ! तुला घेतल्यावांचून मी हलायची नाहीं इथून !

**राधा**—तर मग थांब बापडी ! माझ्याबरोबर कुंजेश्वराच्या दर्शनाला तूं आलीच आहेस, तर तें घेऊनच आपण जाऊं.

**चंद्रिका**—कृष्णाची भेट मी तुला आज तरी घेऊं द्यायची नाहीं, समजलीस ? गोकुळांतल्या तरुण पोरींना आपल्या रूपानं वेड लावून त्यांच्याबरोबर रात्रीं बेरात्रीं कुंजवनांत हवा तसा गोंधळ घालणारा हा गांवगुंड पोर म्हणे ईश्वर !

**राधा**—शिवशिव ! काय बोलतेस हें, चंद्रिके ? त्या निर्मल, निष्पाप श्रीकृष्णाविषयीं असले घाणेरडे उद्गार तूं तरी काढूं नकोस. खरोखर, श्रीकृष्ण म्हणजे त्रिभुवनांत जें मंगलांतलं मंगल, निष्पापांतलं निष्पाप, त्याचं केवळ सार आहे !

[ राग-यमन; ताल-त्रिताल; चाल-चतरन बालम० ]

**नच लव श्यामल करि अघ तन्मन । हृदय धाम वरि वसतिस सुरगण ॥ ध्रु०॥ पावकाला विमल मलिनता ये विशाल, करितां तुलेला । धर्म त्यानिकटिं दिसला धवल न ॥ १ ॥**

**चंद्रिका**—अग हो ! पुरे कर तुझं कृष्णपुराण ! पुष्कळ ऐकलं आजवर ! तुझ्याशीं दिवसरात्र कानगोष्टी करणारा तो टारगट पोरगा लहानपणापासून काय गुण उधळीत आला आहे, ते सारं गोकुळ आजपर्यंत पहातच आलं आहे ! ( स्वगत ) ही राधा आणि मी बरोबरीच्या; असं असतांना कृष्णाचं हिच्यावरच जिवाभावाचं प्रेम, आणि माझ्याकडे तो ढुंकूनही पहात नाहीं, म्हणून तर या दोघांवर माझा राग ! वाट पहातां पहातां संधि तर आली हवी तशी ! आतां माझा सूड चांगला उगवून घेतें या दोघांवर ! ( उघड ) अशी पहात काय उभी राहिली आहेस ? आपल्या कानांला हात लावून, साऱ्या जगाचं तोंड तूं कशी बंद करणार ?

**राधा**—खरंच चंद्रिके, जगांत जीं अत्यंत दुष्कर कर्मं आहेत त्यांत दुर्जनांचं तोंड बंद करणं हें सर्वांत कठिण आहे.

**चंद्रिका**—तूं मला दुर्जन म्हण, किंवा कृष्णाला अगदीं परमेश्वर म्हण; पण तुझ्या या गांवढया देवाचं दर्शन मी आतां तुला घेऊं देणार नाहीं. तुझ्या आंधळ्या सासूनं आणि मत्सरामुळं अंध झालेल्या तुझ्या पतीनं तुझ्यावर पहारा करण्याचं आणि कृष्णाची न् तुझी भेट न होऊं द्यायचं काम आजपासून माझ्यावर सोंपविलं आहे, समजलीस राधे ?

**राधा**—चंद्रिके, तूं जा आतां. ज्या कुणीं तुला माझ्यावर टेहेळणी करण्या-साठीं नेमलं आहे, त्यांना जाऊन सांग, कीं राधा या बाबतींत तुमचा अधिकार साफ मानीत नाहीं ! माझीं पत्नी या नात्यानं कर्तव्यं काय आहेत तीं मला नीट समजतात; पण मनुष्याला जगांत दुसरींही महत्त्वाचीं कर्तव्यं आहेत, हें कुणीं विस-रतां कामा नये.

**चंद्रिका**—अग हो ! कर्तव्याचा उजेड पडला तुझ्या ! पण अधिक चर्चा हवीच कशाला मुळीं ? येतेस कीं नाहीं तूं ? जाऊं मी ? नाहीं तूं येत ?

**राधा**—नाहीं, श्रीकृष्णाला भेटल्यावांचून मी साफ येत नाहीं. तूं जा आपली—

**चंद्रिका**—राधे, गोकुळच्या जादुगाराच्या जादूनं तुझी नजरबंदी केली आहे. पण सूक्ष्म बीजाचाच प्रचंड वृक्ष होतो, हें नीट ध्यानांत ठेव ! [ जाते.

**राधा**—श्रीकृष्णाविषयीं मत्सर ! श्रीकृष्णाविषयीं पापी कल्पना ! श्रीकृष्णाच्या ठिकाणीं पापाची कल्पना करण्यापेक्षां जगांत दुसरं घोर पातकच नाहीं ! सूर्यचंद्रा-दि देवतांनो, तुम्हींच सांगा, पत्नीधर्मापेक्षां पतिव्रतेला आणि पतिधर्मापेक्षां पत्नी-निष्ठ पुरुषाला अधिक पवित्र असे धर्म आहेत ना ? काय करूं ? नाथांच्या मनाचं समाधान करण्यासाठीं, श्रीकृष्णाचं मुखावलोकनही न करण्याची त्यांची आज्ञा मान्य करून, माझा पत्नीधर्म अक्षरशः पाळूं, कीं पतिराजांच्या या आज्ञेकडे दुर्लक्ष्य करून श्रीकृष्णाची इच्छा सुफलित करायला त्याला साहाय्य करूं ? पूर्वजन्मींचे लागेबांधे असोत, किंवा दुसरं कांहीं कारण असो, श्रीकृष्ण मला आपली भगिनी समजून माझ्यापाशीं आपलं अंतःकरण उघड करून दाखवितो; स्वजनांच्या हिताविषयीं आपल्या अंतःकरणाला लागून राहिलेली तीव्र तळमळ माझ्यापाशीं मोकळ्या मनानं व्यक्त करतो. माझ्या सहानुभूतीनं, उत्तेजनानं त्याला या कार्यांत प्रोत्साहन येतं. ठरला, माझा निश्चय ठरला ! नाथांच्या संशयाचे आणि कोपाचे सारे परिणाम मला सहन केले पाहिजेत. आज दोन दिवसांत श्रीकृष्ण मला भेटला नाहीं. आपल्या या आवडत्या कुंजमंदिरांतहि तो आला नाहीं. माझं मन मला सांगतं, कीं श्रीकृष्ण

कांहीं तरी दारुण चिंतेंत आहे. त्याची चिंता म्हणजे माझ्या मनाची चिताच होय !

[ राग-तिलककामोद; ताल-झपताल; चाल-सकल दुखहरन० ]

**दहन खर हृदया । महाघोर रणरणक करित कृष्णासि बहु आकुल-भावना सभय ॥ ध्रु० ॥ आधार विश्वासि । मंगल-साधनासि । विकृति होतां तया । आगत हा महाप्रलय ॥ १ ॥**

[ जाते.

[ नंद आणि यशोदा प्रवेश करतात. ]

**नंद**—नाहीं, या कुंजमंदिरांतही नाहीं ! हा गेला तरी कुठं ? आज दोन दिवसांत कृष्णाचा पत्ता नाहीं ! देवि यशोदे, हा तुझ्या फाजील लाडांचा आणि भलत्याच शिकवणुकीचा परिणाम बरं !

**यशोदा**—म्हणजे ? कान्ह्याला मी का शिकवलं, कीं दोन दोन दिवसांत तूं घरीं येत जाऊं नकोस म्हणून ?

**नंद**—असं वेड पांघरण्यांत काय अर्थ आहे ? दोन दोन दिवसांत कृष्ण घरीं येत नाहीं, याचं कारण त्याच्या मनांत तूं भरवून दिलेल्या भलत्याच महत्त्वाकांक्षा, समजलीस ? तूं आणि त्या राधेनं त्याच्या डोक्यांत भलभलतीं वेडं भरविलीं आहांत, तीं त्याला सुखाचे दोन घांसही खाऊं देत नाहींत. त्या विचारभ्रमणामुळं रात्रीच्या रात्री त्याला डोळ्याला डोळा लागल्यावांचून काढाव्या लागतात.

[ राग-बिहाग; ताल-त्रिताल; चाल-आन परी तुम० ]

**आणी जल नयनांसि, अकालीं । सुतमुखशोभा म्लान जहाली ॥ ध्रु० ॥ होय हा ! कृश तनु बलशाली । भ्रान्त विचारें जी बहु धाली ॥ १ ॥ शांत सुंदर चंद्रकलाही । ताप मनातें दे क्षयकालीं ॥ २ ॥**

**यशोदा**—शान्त, गाढ निद्रा आणि चमचमीत सुग्रास भोजन, हीं सुखं मेलेल्या श्रीमंतींत, अंतःकरणशून्य श्रीमंतांना सेवन करतां येतात. उदरंभरणाशिवाय ज्यांना कधीं कसलीच काळजी शिवत नाहीं, असले कावळेकुत्रे मिळतील ते घाणेरडे अन्नाचे कण सुखानं खाऊन, शान्तपणानं झोंपी जातात. परंतु नाना प्रकारच्या आधिव्याधींनीं गांजलेल्या, भयंकर आपत्तींनीं पीडिलेल्या, स्वजनांच्या अनंत यातनांच्या मूक आरोळ्या ऐकून, ज्याचं अंतःकरण तिळतिळ तुटतं, त्याला सुखानं झोंप कशी येणार ? सभोंवतालच्या दीनदुनियेला रात्रंदिवस अन्नाचे फांके पडत

असतां, सुग्रास चमचमीत अन्न त्याच्या घशाखालीं कसं उतरणार ?

**नंद**—यशोदे, कृष्णाच्या डोक्यांत तुम्हीं वेडं भरविलीं म्हणून मी म्हणतों तीं हींच ! स्वजनांच्या, फार काय साऱ्या जगाच्या कल्याणाच्या दुरून तोंडपाटिलक्या करणं फार सोपं; परंतु तें प्रत्यक्ष हातानं करणं महाकर्म कठीण आहे ! या मार्गानं थोडंसं जातांच, ध्यानीं, मनीं, स्वप्नीं ज्या संकटांची कल्पना नसते, तीं संकटं, अकल्पित रीतीनं दत्त म्हणून पुढं उभीं रहातात, आणि मग केलेल्या वल्गना फोल ठरून, आक्रमिलेल्या मार्गावरून त्याला धड परत फिरतां येत नाहीं, किंवा पुढंही जातां येत नाहीं; आणि जागच्या जागीं त्याची गठडी वळून, त्याच्याबद्दलचा जगाचा उपहास मात्र मागं राहून, तो जगांतून अगदीं नांवासकट नाहींसा होऊन जातो !

**यशोदा**—त्याच्या उदाहरणानं, त्याच्या मागून येणाऱ्या तशाच उदात्त महाभागाला त्या संकटांची धोक्याची सूचना मिळून, तेवढीं तरी संकटं त्याला टाळतां येतात, हा काय त्याच्या नाशाचा जगाला कमी उपयोग होतो ? जगत्कल्याणाचा दुर्गम दुर्ग काबीज करण्यासाठीं अशा हजारों उदात्त महाभाग वीरांच्या प्रेतांच्या खचावरूनच शेवटच्या विजयी वीराला जावं लागणार आहे.

**नंद**—देवि यशोदे, तुझे हे विचार ऐकायला कितीही उदात्त आणि सुंदर असले, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत मला ते पटत नाहींत. मी आहें आपला सरळ व्यवहारी मनुष्य ! जगाची काळजी जग उत्पन्न करणाऱ्या परमेश्वरावर सोंपवून, प्रत्येक मनुष्यानं आपल्यापुरतं पहावं, असं अनुभवानं माझं मत बनलं आहे. सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याची ताकद आम्हा निर्बल मनुष्यांत नाहीं.

[ राग–जिल्हा खमाज; ताल–पंजाबी; चाल–नइ नार नयो० ]

**उपहासिं बघे नर जो प्रभुकृतिंना । अज्ञानीं कुणि त्यासि तुलेना ॥ ध्रु० ॥ पर्णासिहि हालवि प्रभु अवधानें । वांछि विकारा मूढ मनुज ! ॥ १ ॥**

**यशोदा**—शरीरानं निर्बल, मनानं निर्बल, आत्म्यानं निर्बल, अशा माणसांना परमेश्वर खरोखरीच कसलंही साह्याय्य न करतां परिस्थितीच्या घाणेरड्या नरकांत जन्मभर पचवून मारतो. निर्गुण निराकार परमेश्वर जगाचं हित इतरांच्या द्वाराच करवितो. त्याचे मत्स्यकूर्मादि पशुरूपी अवतार हेंच सुचवितात, कीं केवळ

मनुष्यालाच नव्हे,तर पशूंनाही मनाच्या आणि आत्म्याच्या बळावर जगाचं कल्याण करतां येतं. मनुष्यांनीं आपल्याभोंवतींच पहाणं ही निव्वळ पशुवृत्ति आहे !

**नंद**—यशोदे, तुझीं हीं परहिताचीं आणि जगत्कल्याणाचीं तत्त्वं ऐकायला कितीही सोज्वळ असलीं, तरी त्यांची झळ मला लागतां कामा नये, हें मी तुला साफ सांगतों. कृष्ण माझा पुत्र–माझा केवळ प्राण आहे. गोकुळच्या जहागिरीचा तो भावी अधिपति आहे. त्याचं स्वतःचं कल्याण त्याला कळत नाहीं, तर त्याच्या कल्याणाची काळजी मला घेतली पाहिजे. कृष्णाच्या पुंडाईचा पक्का बंदोबस्त कर-ण्याचा मीं निश्चय केला आहे. कंसमहाराज कसेही असले, तरी ते आपले राजे आहेत. मथुरेच्या सिंहासनाचा अभिमान बाळगून, त्यावर विराजमान झालेल्या प्रत्येक व्यक्तीशीं एकनिष्ठपणानं वागणं, हें आपलं कर्तव्य आहे. नाविष्णुः पृथि-वीपतिः !

**यशोदा**—अराजनिष्ठेसारखं महापातक एकही नाहीं, हें कोणता सुज्ञ नाकबूल करील ? कृतघ्नता–त्यांतून राजाशीं कृतघ्नता, म्हणजे अमानुषतेची सीमाच होय ! पण उलट पक्षीं, राजाचं नाणं खरं पाहिजे, हेंही तितकंच खरं आहे. महानुभाव राजा उग्रसेन हा मथुरेच्या सिंहासनाचा खरा अधिकारी. त्याला–प्रत्यक्ष आपल्या पित्याला–जबरदस्तीनं सिंहासनावरून हुसकून लावून, त्याचं राज्य या दुष्टशिरो-मणि कंसानं बळकावलं. त्याच्या या कृत्याला, महाराज, न्याय, नीति आणि शिष्ट-रीति यांचा पाठिंबा होता काय ? नुसत्या स्थानमाहात्म्यामुळं बंडखोर कंसाशीं नमून वागणं हा केवळ अधर्म होय.

**नंद**—पण आपणाला काय ? मथुरेच्या सिंहासनावर उग्रसेन बसो, नाहींतर कंसमहाराज बसोत ! सिंहासनाशीं एकनिष्ठतेनं रहायचं हा आपला धर्म होय.

**यशोदा**—कंसाच्या ठिकाणीं आपली इतकी जाज्वल्य निष्ठा आहेना ? समजा, उद्यां युवराज केशीनं कंसाची गठडी वळवून त्याची गादी बळकावली; तरी, त्याच्याही पुढं आपण तितक्याच नम्रतेनं मान वांकविणार काय ?

**नंद**—अरे हो ! वादाच्या प्रवाहांत मी इतका वहावलों, कीं आपण इकडे आलों कशाला, त्याचाही मला विसर पडला. केशीच्या या स्वारीची बातमी कृष्णा-च्या कानांवर घालून त्याला वेळींच सावध करून ठेवावा, यासाठीं आपण इकडे आलों, तर कृष्णाचाच पत्ता नाहीं ! यशोदे, मी पुरुषासारखा पुरुष, पण वसुदेवानं मथुरेहून पाठविलेल्या या बातमीनं मी खरोखरीच गर्भगळीत होऊन गेलों आहें !

केशी महाबलवान्-अत्यंत पराक्रमी आहे. परवां दशमीच्या दिवशीं कंसमहाराजांचा एकावन्नावा वाढदिवस असून, त्या दिवशीं सम्राट् जरासंधमहाराजांकडून 'महामंडलेश्वर' हा किताब त्यांना मोठ्या थाटानं अर्पण करण्यांत येणार आहे. त्या दिवशींच्या दरबारांत कृष्णाला जिवंत अगर मृत आणून हजर करतों, अशी केशीनं प्रतिज्ञा केली आहे. परवां प्रातःकाळीं केशी—

**राधा** ( प्रवेश करून )—यमपुरीला जाणार! महाराज, मथुरेहून श्रीकृष्णाच्या नाशाकरतां निघालेला कोणता प्रवासी थेट यमपुरीला पोंचल्यावांचून आजपर्यंत राहिला आहे? महाराज, श्रीकृष्णाच्या बाळपणापासून या गोष्टी आपल्या इतक्या सहवासाच्या झाल्या असतां, प्रत्येक वेळीं आपण चिंतेंत पडावं, हा मोठा चमत्कार आहे! श्रीकृष्णाचा पराक्रम, बुद्धि, चातुर्य—

**नंद**—हीं सारीं प्रचंड आहेत, हें मला कबूल आहे. पण राधे, प्रेमाच्या शंकाशील दृष्टीला तीं सारीं सूक्ष्म भासून, शत्रूचं कपट, निर्दयता आणि दुष्टपणा हीं सारीं त्यांच्या शतपटीनं प्रचंड भासूं लागतात. कंसमहाराजांचा एवढा आग्रहच आहे, तर कृष्णानं राजा म्हणून त्यांच्यापुढं मान वांकवायाला काय हरकत आहे?

**राधा**—न्याय, नीति, आणि धर्म, यांच्यापुढंच नम्र होणारं आपलं मस्तक अन्याय, अनीति, आणि अधर्म, यांच्यापुढं नम्र करण्यापेक्षां श्रीकृष्णासारखे असामान्य तेजस्वी पुरुष आपल्या सर्वस्वाचा यज्ञ करायला तयार असतात.

**नंद**—राधे, कृष्ण कुठं आहे? दोन दिवसांत तो वाड्यांत आला नाहीं. सायंकाळीं तो आपल्या या कुंजमंदिरांत आल्याशिवाय रहात नाही, अशी खात्री असल्यामुळं आम्ही इकडे आलों; पण त्याचा इथंही पत्ता नाहीं. तो कुठं गेला आहे हें तुला ठाऊक आहे का?

**राधा**—नाहीं बाई! आज दोन दिवसांत श्रीकृष्णाची आणि माझी गांठ नाहीं. आणि म्हणूनच मी आज या वेळीं इथं आलें.

**यशोदा**—काय म्हणतेस राधे? दोन दिवसांत कान्हा तुला भेटला नाहीं? बरं, पण तूं इकडे कधीं आलीस?

**राधा**—सरकारस्वाऱ्या येण्यापूर्वी थोडा वेळ. श्रीकृष्णाची वाट पहात मी कुंजामध्यें बसलें होतें. आपल्या संभाषणांत व्यत्यय येऊं नये, म्हणून मी पुढं आलें नाहीं.

**नंद**—राधे, या गडबडीच्या वेळी देखील तुला मी सांगतों, कीं कृष्णाच्या आणि तुझ्या स्नेहाविषयीं अनयाचं मन अत्यंत कलुषित झालं असून दिवसेंदिवस त्याची गढूळता अधिकाधिक गाढ होत चालली आहे. अनय आजच संतापानं लाल होऊन माझ्याकडे आला होता. त्याची समजूत घालण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला; पण व्यर्थ !

**यशोदा**—राधे, याचसंबंधानें तुझ्या सासूबाईही आज माझ्याकडे आल्या होत्या. त्यांची समजूत घालण्याच्या बाबतींत मला इकडच्याप्रमाणंच अनुभव आला. तेव्हां तूर्त तुला एवढंच सुचवितें, कीं कांही दिवस तरी तूं कान्ह्याची भेट घेऊं नकोस.

**नंद**—राधे, आम्ही आतां जातों. कृष्ण आतां भेटेल असं मला वाटत नाही. तुला तो भेटला, तर त्याची मी अगदी उत्कंठेनं वाट पहात बसलों आहें, म्हणून त्याला सांग.

**यशोदा**—राधे, कान्ह्याला सांग, कीं इकडची भेट घेण्यापूर्वी मलाच अगोदर येऊन भेट.

[ नंद आणि यशोदा जातात.

**राधा**—श्रीकृष्णाची भेट घेऊं नको ! आईसाहेब, मी शरीरानं कोमल अबला असलें, तरी माझं हृदय दगडाचं बनलेलं आहे, आणि नुकत्याच केलेल्या माझ्या निश्चयाचीं अक्षरं त्यावर वज्रालेपीनं उमटलीं आहेत ! श्रीकृष्णाची भेट घेऊं नको !–मी तर म्हणतें, श्रीकृष्ण येतांच–अगबाई ! पण हा पहा श्रीकृष्ण आलाच ! [ यमुनेच्या प्रवाहांतून नौका वल्हवीत कृष्ण येतो. ] श्रीकृष्णा, तुला शंभर सोडून दोनशें वर्षांचं आयुष्य आहे !

**कृष्ण** ( सुस्कारा सोडून )—कशाला दीर्घायुष्य ! अथवा, माझ्यासारख्या पाषाणाला शंभर दोनशेंच काय, पण हजारो वर्षांचं दीर्घायुष्यहि पुरं शोभेल !

[ राग–भीमपलास; ताल–त्रिताल; चाल–तदानि तदानि तों० ]

**अधम परम जन । भुवना दूषण । मजसम हतगुण । धाता निर्मि न ॥ ध्रु० ॥ झालों नवयौवनास मातृकास प्रखर दहन जनिं या जन्मुन ॥ १ ॥**

**राधा**—श्रीकृष्णा, आज तूं असा उदास कां ? असे खेदाचे उद्गार तूं आजच कां काढतोस ?

[ राग-मांड; ताल-पंजाबी; चाल-कोन कोन कोन गुन० ]

**त्यागभाग सांग तव हीन कोणता? ॥ ध्रु० ॥ पूर्ण विरागी निजसुखभोगीं। परानुरागीं होसि देवता ॥ १ ॥ विश्वपित्यासी चिंता न अशी। गणि सृष्टीशीं। तोहि भिन्नता ॥ २ ॥**

श्रीकृष्णा, महाभाग्यशाली पुरुषसिंहा, एकदां गंभीर दृष्टीनं आपल्या आयुष्याचं सिंहावलोकन कर, आणि सांग, कीं खरोखरीच आपलं आजपर्यंतचं आयुष्य निवळ निरुपयोगी गेलं, असंच का तुला वाटतं? आपल्या सतरा अठरा वर्षांच्या कोमल बाल्यांत, मोठमोठ्या पराक्रमी म्हणून गाजलेल्या जरठ वीरांना आपल्या शंभर शंभर वर्षांच्या आयुष्यांत जे पराक्रम गाजवितां आले नाहींत, ते अचाट पराक्रम करून तूं आपल्या मातापितरांच्या, स्वकुलाच्या, स्वजनांच्या उपयोगीं पडला नाहींस का? त्यांचं मुख तूं उज्ज्वल केलं नाहींस का?

**कृष्ण**—कसल्या क्षुल्लक त्या गोष्टी! राधामाई, नुसतं सिंहावलोकन करून त्या तेजस्वी प्राण्याच्या मनाचं समाधान होत नाहीं. राधामाई, समोर पहा, कामाचा केवढा तरी अनुल्लंघ्य पर्वत गगनाला भेदीत उभा आहे! दुःखितांच्या दुःखयातना इतक्या दूरच्या अंतरावरून मला ऐकूं येत आहेत, कीं त्यांतलं कोट्यंश तरी अंतर साऱ्या जन्मांत आपणाला कधीं आक्रमण करतां येईल कीं नाहीं, असं वाटून माझी छाती दबकून जाते!

**राधा**—श्रीकृष्णा, माणसानं केवळ विचारांतच आपल्या मनाला गुंतवून ठेवलं म्हणजे विचार त्याच्यावर कुरघोडी करून जन्मभर त्याला आपल्या पकडींतून सोडीत नाहीत. श्रीकृष्णा, आजच तुझी अशी विषण्ण वृत्ति कां झाली? कालपासून तूं होतास तरी कुठं? दोन दिवसांत तुझं दर्शन नाहीं, म्हणून मनाला कशी तळमळ लागून राहिली आहे.

**कृष्ण**—काय सांगूं तुला राधामाई? आज दोन दिवस माझ्या मनाची जी वृत्ति होऊन गेली आहे, तिचं यथार्थ वर्णनही मला करतां येत नाहीं. माझ्या हृदयाशी तुझं हृदय समरस झालं आहे; त्याच्या अंतर्वेदना त्याला कळतात; त्याच्याविषयीं त्याला अत्यंत सहानुभूति वाटते. म्हणूनच कदाचित् तुला माझ्या सांप्रतच्या हृदयस्थितीची कल्पना होईल. आज सतरा अठरा वर्षं गोकुळांत मी वाढलों, खेळलों, बागडलों; तूं म्हणतेस त्याप्रमाणं माझ्या मातापितरांच्या, आप्तेष्टांच्या, गोकुळच्या प्रजेच्या बऱ्यावाईट रीतींनं मी उपयोगीं पडलों; पण माझ्या कर्तव्या-

ची सीमा इथंच संपते का ? गोकुळापलीकडे माझ्या कार्यक्षेत्राची मर्यादा जाऊं शकतच नाहीं का ? गोकुळांतले लोक तवढेच माझे बंधुबांधव काय ? या प्रश्नांनीं आज दोन दिवस माझं मस्तक भणाणून गेलं आहे. या शूरसेनदेशांतलीच नाहीं, या आर्यावर्तांतलीच नाहीं, तर समग्र पृथ्वीवरील सर्व आर्त मानवजाति मला करुण स्वरानं हांका मारून "कृष्णा आमचं रक्षण कर," अशी आज्ञा मला करीत आहे; त्यांच्या संरक्षणाकरितां, दुःखनिवारणाकरितां कार्यक्षेत्रांत उडी टाकण्याची वेळ आली आहे, असं माझं मन मला सांगूं लागलं. म्हणून राधामाई, यमुनेंतील माझ्या एकांत कुंजद्वीपांत जाऊन मनाला कांहीं तरी शान्ति मिळते का पहावं, म्हणून मी दोन दिवस तिकडे गेलों होतों. परंतु व्यर्थ !

**राधा**—महाभागा, आतां अधिक विचारांच्या भरीला न पडतां मनाच्या मर्दुमकीनं जगाच्या कार्यक्षेत्रांत उडी घे. मथुरेच्या आपल्या खऱ्या निरपराध राजाला सिंहासनावरून अन्यायानं खालीं ओढून त्याचं राज्यवैभव जबरदस्तीनं बळकावणाऱ्या पापी तोतयाचं शासन करून शूरसेनाच्या त्राहि भगवान् होऊन गेलेल्या प्रजेचा त्राता भगवान् तूं हो. तुझ्या दिव्य मंगल कार्याला याच कृतीनं प्रारंभ होऊं दे.

**कृष्ण**—राधामाई, मला सतत भंडावून सोडणारा विचार तो हाच ! कंसानं माझे व्यक्ति या नात्यानं शेंकडों अपराध केले आहेत. पण तेवढ्या एकाच कारणामुळं मी त्याचं शासन करायला उद्युक्त झालों, तर जगाच्या दृष्टीनं मी पराकाष्ठेचा स्वार्थी दिसणार नाहीं का ? राधामाई, कंसाचा निग्रह करून मथुरेच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार मला आहे कीं नाहीं, याचा निर्णय माझं मन मला अद्यापि देत नाहीं.

**राधा** (स्वगत)—अजूनही श्रीकृष्णाच्या पराक्रमसूर्याच्या उदयाला थोडा काल गेला पाहिजे, असा परमेश्वराचा हेतु दिसतो. (उघड) श्रीकृष्णा, महाराज आणि आईसाहेब इथं येऊन बराच वेळ तुझी वाट पहात होतीं. काम अतिशय महत्त्वाचं आहे. कंसाचा भाऊ केशी यानं परवांच्या दरबारांत तुला जिवंत अगर मृत पकडून न्यायची प्रतिज्ञा केली असून तो परवां सकाळीं इथं येणार आहे. याचसंबंधांत महाराजांनीं तुला ताबडतोब भेटून जायला सांगितलं आहे. पण त्यापूर्वी तूं आईसाहेबांना भेट—

**कृष्ण**—हा मी निघालोंच— [ जातो.

**राधा**—आतां मघाशीं सुचलेल्या विचाराच्या मागं लागल्याखेरीज गत्यंतर नाहीं. हरएक प्रयत्न करून दुष्ट कंसाची पापी दृष्टि मजकडे वळविलीच पाहिजे.

[ राग–जिल्हा काफी; ताल–पंजाबी; चाल–चलो हटो बग्यां० ]

**वरित हा देवांच्या हृदया। मजला गणि जो गुरुसम वाया॥ ध्रु०॥ विपदि घोर हा मज जरि पाही। तरि ये खरता कृतिपरा तया॥ १॥**

[ जाते.

---

## प्रवेश दुसरा

[ मथुरेच्या राजवाड्यांतील एक दालन. चाणूर हातामध्यें एक गदा घेऊन प्रवेश करतो. ]

**चाणूर**—ही गदा म्हणजे निव्वळ जादूची कांडी आहे! या गदेच्या करामतीवर मी काय कमवीत नाहीं? माझ्या आईनं मला जन्म दिला, पण या गदेनं शरीर दिलं. आईबापांपेक्षां हिचेच माझ्यावर डोंगराएवढे उपकार आहेत! कंसमहाराजांचा मी अगदीं प्राण होऊन बसलों आहें, तोही या गदेच्याच करामतीनं! त्यांच्या कृपेनं आज मला कोणती गोष्ट कमी आहे? ( सुस्कारा सोडून ) कसली कृपा! कंसमहाराज आपल्या दोन अर्धांगींसह पूर्ण सुखविलास भोगीत असतां त्यांनीं आम्हां राजमल्लांचं अर्धांग कायमचं लुलं करून संसारांतून आम्हांला पुरं उठविलं आहे! आम्हीं राजमल्लांनीं विवाह करून संसारसुख उपयोगतां कामा नये, इतकंच नव्हे, तर कोणत्याही स्त्रीकडे वांकडा डोळाहि न करतां मारुतीप्रमाणं सारा जन्म आम्हीं कडकडीत ब्रह्मचर्यांत काढला पाहिजे, असा त्यांचा आम्हां सर्व मल्लांना सक्त हुकूम आहे. हा हुकूम तोडण्याच्यापायीं पुष्कळ मल्लांना प्रसंगीं आपलीं डोकीं गमवावीं लागलीं आहेत. हा जन्माचा जुलूम सोसायला कोणता खरा मर्द तयार होईल? सुखाचा मार्ग राजरोस बंद झाल्यावर, काळोखांतल्या कारभाराकडे कुणीही सहजच वळणार! आमच्यासारख्या आडदांडांवर सुंदर, नाजूक कुलयुवती थोड्याच फिदा होणार आहेत! असा आपण होऊन मींच पोक्त विचार केला, आणि जरा खालच्या रस्त्याला लागलों. पण काय? उथळ पाण्याला खळखळाट फार; तसा हलकट दासींना दिमाख फार, असाच मला ठिकठिकाणीं प्रत्यय येऊं लागला. गुप्तपणानं आणि सावधपणानं हें कारस्थान करीत असतां आमच्या

चाचपणीच्या चाळणींतून एकएक चिमखडा गळूं लागला, आणि शेवटीं रहातां राहिला हा कुब्जेचा धोंडा! कुब्जा माझी हेटाळणी करणार नाहीं, या आशेनं मी भुतासारखा या हडळीच्या भोंवतीं घिरट्या घालूं लागलों आहें. अरे, हडळीचं नांव काढतांच ही पहा दत्त म्हणून उभी! चला, इथंच थोडा वेळ लपून बसूं आणि रागरंग पाहून हिच्या मनधरणीच्या कामावर रुजू होऊं. [ जातो.

[ कुब्जा प्रवेश करते. ]

**कुब्जा**—देवा, किती अंत पहातोस? कृष्णचंद्रा, मला आतां या यातना सहन होत नाहींत; प्राणजीवना, तुझ्या दर्शनाच्या तहानेनं माझे प्राण कसे कासावीस होऊन गेले आहेत रे! एकदां आपलं दर्शन देऊन या अभागिनीचे प्राण वांचवा गडे!

[ राग-गौरी; ताल-त्रिताल; चाल-सुघर जागे हरिपद० ]

**हृदयकान्ता! सुखवा कान्ता। दर्शन निज वितरा, शान्ता! ॥ ध्रु ०॥ पूर्णचंद्र हा, ही कृष्ण निशा-। संशयमलिना न करा स्वान्ता ॥ १॥ दोष न दीपा,ज्वलनीं जळतां। प्रणयिं पतंगी करितां स्वान्ता ॥ २ ॥**

तुला हें कठीण का आहे? तूं तर प्रत्यक्ष श्रीच्याही भाग्याचा भगवंत! श्रीकृष्णा, गोकुळच्या भाग्यवान् गवळणींना अहोरात्र तुझ्या विश्वमोहन रूपाचं दर्शन व्हावं आणि या कुब्जेच्या कपाळीं तें सटींसहामासीं देखील असूं नये, हें तुझ्यासारख्या समदृष्टि देवाला शोभतंना? देवा, गोकुळची गवळण होऊन अष्टौप्रहर तुझ्या दर्शनाचा ब्रह्मानंद मलाही साध्य करून घेतां येईल. पण सख्या, ही कुब्जा कितीही वेडीबागडी असली, तरी तिचं हृदय कांहीं काळ्या फत्तराचं बनलेलं नाहीं. देवा, मी गोकुळी आलें, तर माझं पापी दर्शन तुला घडून, तुझ्या कमलदृष्टीला असह्य यातना होतील, ही एकच भीति माझ्या दृष्टीसमोरून कधींही हलत नसल्यामुळं मी गोकुळची गवळण होत नाहीं.

**चाणूर** ( प्रवेश करून )—सुंदरि—

**कुब्जा**—या कुब्जेला देखील 'सुंदरी' म्हणून जिभल्या चाटणारे रसिक रंगलाल जगांत आहेत एकूण! कोण, चाणूर?

**चाणूर**—होय, तुझा दासानुदास चाणूर! सुंदरि, तुला 'सुंदरी' म्हटल्यामुळं माझा तुला राग तर नाहींना आला?

**कुब्जा**—चाणूर, मला तुमचा राग आला आहे; पण त्याचं हें मात्र कारण नाहीं.

**चाणूर**—थांब, सांगूं नकोस तें कारण-मीच सांगतों. तुझ्या दोन्ही गालांवर, तुझ्या या प्रियकराच्या आगमनामुळं लज्जेची लाली चढली आहे ! पंडितांच्या भाषेंत बोलायचं, म्हणजे तुला ' राग ' आला आहे. सांग, ओळखलं कीं नाहीं तुझ्या रागाचं कारण ?

**कुब्जा**—तांबडमातींत तीन्हीं त्रिकाळ हुंदडणारे तुम्ही; तुम्हाला लाल रंगाशिवाय दुसरं काय दिसणार आहे, माती ?

**चाणूर**—बरोबर खुबी शोधून काढलीस आमची ! आम्हां तालीमबाजांना लाल रंग अतिशय प्रिय. भांगेनं, नाहीं तर दारूनं आमचे डोळे नेहमी लालबुंद धुंदकारलेले असतात; आमचीं वस्त्रं, आमचीं अस्त्रं, आमचीं शरीरं आखाड्यांतल्या मातीमुळं नेहमीं लालीलाल असायचीं. आम्हा तालीमबाजांचं दैवत बजरंग मारुती पहा,लाल शेंदरानं माखलेला, आणि त्याच्या भक्तीचा लाल शिक्का नेहमीं आमच्या कपाळीं ! आम्हांला आमच्या कामगिरीबद्दल बक्षिसं मिळायचीं, तीं देखील बहुधा पागोटीं, दुपेटे वगैरे लाल वस्त्रं ! अग, फार काय सांगूं ? आम्हा तालीमबाजांचा चिरकालचा वैरी जो बुद्धिदाता गजानन, त्याचा देखील रंग आमच्या संसर्गामुळं लालीलाल ! फार कशाला कुब्जे, तूं इतकी कुरूप असतां त्याच्याकडे अगदीं दुर्लक्ष्य करून मी जो तुझ्यावर अगदीं रंगेलपणानं रंगून गेलों आहे, तो देखील त्यांतल्या त्यांत किंचित् लाल अशा या ओठांच्या चुंबनाच्या आशेनंच ना?

**कुब्जा**—या गदेनं डोंगराएवढं शरीर कमावतां येत असेल, पण तिळभर अक्कल कांहीं तिच्यामुळं मिळवितां येत नाहीं. नाहीं तर तुमच्यासारख्या गदाबहाद्दरानं माझा नाद केव्हांच सोडला असता !

**चाणूर**—मग कुणाचा नाद धरूं, तें तरी मला सांग. मी आहें निव्वळ पिशाच ! मला घट्ट पकडून ठेवायला एखादं झाड हें पाहिजेच ! माझ्या योग्य अशीं झाडं शोधतां शोधतां मी अगदीं जिकीरीला आलों आहें पहा ! कोणतंच झाड मला आपला आश्रय घेऊं देत नाहीं ! अगदीं शेवटचं झाड, म्हणून तुलाच बळकट धरून बसायचा माझा विचार आहे. कुब्जे, तुझ्यासारखी कुरूप दासी साऱ्या वाड्यांत एक तरी मला दाखवून दे, आणि मग मला आपला नाद सोडायला सांग.

**कुब्जा**—मी तुम्हांला शेवटचं निक्षून सांगतें, कीं एका पुरुषोत्तमाशिवाय ज-

गांतील सारे पुरुष मला बंधुसमान आहेत.

**चाणूर**—अहाहाहा! तुझी ही प्रतिज्ञा ऐकून माझा आनंद गगनांत मावेनासा झाला आहे! अग, पौरुष म्हणजे शक्ति, हें जर खरं असेल, तर 'पुरुषोत्तम' या पदवीला जगांत मीच एकटा पात्र आहें! ( दंड थोपटतो व जोर काढतो.)

**कुब्जा**—चाणूर, शारीरिक बल हें पौरुषाचं एक अंग असलं, तरी हृदयसौंदर्य हाच त्याचा मुख्य गुण होय! तुझाला मुळीं हृदयच नाहीं; मग त्याचं सौंदर्य कुठलं असणार?

**चाणूर**—मग तुझा पुरुषोत्तम कोण, तें तरी सांग एकदां!

**कुब्जा**—पुरुषोत्तम? माझा कृष्णनाथ! माझा कृष्णचंद्र!

**चाणूर**—दुष्टे, तो दुष्ट कृष्ण तुझा वल्लभ? अग चांडाळणी! त्याच्यांत आणि माझ्यांत असं तूं काय अंतर पाहिलंस?

**कुब्जा**—अंतर! अहो चाणूर, माझा कृष्णचंद्र देवांचाही देव, आणि तुझी पिशाचांतले पिशाच! पण तुलनेचे श्रम तरी उगीच कशाला? तुलनेच्या पदार्थामध्यें किंचित् तरी समानधर्म पाहिजे ना? जगत्पित्याचं वाहन राजहंस आणि उकिरड्यांत लोळणारा कोळसा, यांची तुलना तरी कशी आणि काय करायची!

**चाणूर**—कुब्जे, मी तरी तेंच म्हणतों! तुलनेचे श्रम तूं घेऊंच नकोस! अग, हा कोळसा जागेवर तरी राहील; पण तुझा तो उनाड राजहंस वरती उडून जाणार असल्यामुळं, तुझ्या हातीं आतां लागत नाहीं! उद्यां त्याच्या घरट्यांत त्याला पकडून,त्याचे पंख उपटून, युवराज केशी स्वर्गात ब्रह्मदेवाकडे त्याची रवानगी करून देणार आहेत!

**कुब्जा**—चाणूर, ही भीति मला कशाला घालतां? कृष्णवधासाठीं चंग बांधून आलेल्या शकट, तृणावर्त, वगैरे मी मी म्हणणाऱ्या वीरांची त्या वीरश्रेष्ठानं काय दशा केली, हें सर्व जगाला माहिती आहे. आणि याच आपल्या सोबत्यांच्या मार्गं केशी उद्यां जाणार, अशी माझी पुरी खात्री आहे.

**चाणूर**—कुब्जे, कृष्णाच्या पराक्रमाचा दिमाख माझ्यापुढं दाखवूं नकोस! प्रेमांतही कृष्ण माझा प्रतिस्पर्धी आहे, हें तुझ्या तोंडून ऐकल्यापासून त्याला यमाच्या दरबारीं पाठवायला मला अनिवार स्फुरण चढलं आहे. निवळ शक्तीनं माझा मार्ग निष्कंटक करण्याचं काम मला जरी साधलं नाहीं, तरी त्या कपट्याच्या प्रत्येक कपटाशीं सवाई कपट लढवून, अखेरीला याच गदेच्या कणखर हातानं



**मुष्टिक**—तुझ्या डोळ्यांशीं चढाओढ करणारे हे टप्पोरे पेढे ! (पृष्ठ १५.)

त्याचा मी प्राण घेईन. कंसमहाराजांनीं त्याच कामावर माझी नेमणूक केली आहे.

**कुब्जा**—नका हो नका, चाणूर, त्या सरळ मनाशीं, निष्पाप हृदयाशीं अशी कपटी प्रतारणा तुह्मी करूं नका.

**चाणूर** (स्वगत)—वा ! काय छान मख्खी सांपडली शेवटीं ! अजून आशेच्या ओलाव्याला भरपूर जागा आहे. कृष्णाची हिच्यावर पुरी मोहिनी पडली आहे, यांत शंका नाहीं. तेव्हां त्याचंच सही सही रूप वठवून, या कुब्जेला घ्यावी एकदां आपल्या कबजांत ! मग कुठं जाणार आहे ही बटकीची पोर ? कृष्णाला कांहीं अद्याप मी पाहिला नाहीं; तेव्हां उद्यां केशीबरोबर गोकुळाला जाऊन त्याला नीट बारकाईनं पाहून घ्यावा. केशीनं त्याचं चंदन उडविलं तर ठीकच झालं ! नाहीं तर या दुसऱ्या मार्गाचं अवलंबन करावं. ( उघड ) ठीक आहे, कुब्जे, मी जातों. तुझ्या त्या कृष्णचंद्राच्या काळ्या चांदण्यामुळं मी मात्र कायमचाच काळोखांत पडलों म्हणायचा ! पण माझीही आठवण ठेव. अगदींच विसरूं नकोस मला.

[ जातो.

**कुब्जा**—शिव शिव ! श्रीकृष्णासारख्या देवतुल्य उदारचरिताशीं सुद्धां कपट करणारीं राक्षसी वृत्तीचीं माणसं असावीं ना !

[ राग–यमन; ताल–एकताल; चाल–सैय्या तुम बोल० ]

**कुसुमा विधि चारु कान्त । निर्मी आमोदशान्त । परि नाशा त्यासंगें कीटकासि मूढ सृजित ॥ ध्रु० ॥ अखिलभुवनभूषणा प्रेरि जगतिं नरवरासि । दनुज तया, कां न कळे, नाशाया मग निर्मित ॥ १ ॥**

[ मस्तकावर एक मोठा हारा घेऊन मुष्टिक प्रवेश करतो. ]

**मुष्टिक**—घे, हृदयवल्लभे, घे ! हे सारे सुंदर पदार्थ मीं तुझ्यासाठीं आणिले आहेत. प्राणेश्वरि, कंसमहाराजांकरतां केशरी गंध उगाळतांना तुझ्या तळहातांना जो रंग चढला आहे, त्याच्याशीं रंगांत, आणि तुझ्या अंतरंगाशीं गोडींत, स्पर्धा करणारी ही केशरी बर्फी ! तुझ्या डोळ्यांशीं चढाओढ करणारे हे टप्पोरे पेढे ! तुझ्या प्रेमरसाशीं तुलना करतां येण्यासारखी ही खडीसाखर मिसळलेली रबडी ! हे पदार्थ सेवन करून माझ्याबद्दल तुझं हृदय अधिकाधिक गोड होऊं दे. हे स्नेहयुक्त बदाम, पिस्ते, चारोळ्या खाऊन, प्राणेश्वरि, माझ्याबद्दलचा तुझा स्नेह वृद्धिंगत कर. आम्हां मल्लांना मिळणाऱ्या खुराकापैकीं, मला मिळालेला हा आजचा

भाग तुझ्यासाठीं गुपचुप घेऊन येतांना, हृदयदेवते, आज मला सणसणीत उपास पडला आहे ! चल, आपण सौदाच ठरवून टाकूं ! माझा दररोजचा खुराक मीं तुला द्यावा; आणि त्याच्या मोबदल्यांत तूं मला आपलं प्रेम द्यावंस !

**कुब्जा**—मुष्टिक, प्रेम ही सौदा करण्यासारखी का वस्तु आहे ? असल्या या खाऊच्या आशेनं माझं प्रेम तुम्हाला द्यायला मी लहान पोर आहें वाटतं ? काय पोरकट कल्पना तरी !

**मुष्टिक**—तर मग, मोबदल्याशिवाय आपलं प्रेम मला देऊन आपल्या थोर-पणाची साक्ष पटव !

**कुब्जा** ( स्वगत )—कंसाची भीति घालून करूं का ही धोंड कायमची दूर ? पण नको. चाणूराप्रमाणं कृष्णवधासाठीं कंसानं या मांतगाचीही योजना केली असेल. (उघड) मुष्टिक, माझं प्रेम अगोदरच दुसऱ्याचं झालं आहे हो !

**मुष्टिक**—काय ? तूं दुसऱ्याची झाली आहेस ? घात घात-घात झाला ! चांडाळणी, या शब्दांनीं माझ्या हृदयाचा तूं पार चुरा करून टाकलास ! सांग, कोण तो दुसरा ? कोण तो हरामखोर ?

**कुब्जा**—श्रीकृष्ण ! गोकुळचा कृष्णदेव !

**मुष्टिक**—अंः ! तर मग मला संताप करून घ्यायचं कारणच नाहीं. तुझ्या त्या कृष्णदेवाचं चंदन उडवण्याचं काम महाराजांनीं माझ्यावरच सोपविलं आहे. या वज्रमुष्टीचा एकच प्रहार, किंवा या मस्तकांतील एकच कपटी शक्कल, तुझ्या त्या प्रियकराचा कपाळमोक्ष करणार ! पण मी विचारतों कुब्जे, तुझा तो कृष्णदेव तुझ्या प्रेमाच्या जाळ्यांत सांपडणार कसा ? कारण, गोकुळच्या राधेच्या तर म्हणे, कृष्ण अगदीं पायांतला पैंजण होऊन बसला आहे !

**कुब्जा**—अहाहा ! राधा, श्रीराधा ! ती भुवनभाग्यशाली राधादेवी त्रिवार धन्य आहे ! मुष्टिक, राधेच्या भाग्याचा हेवा मी कंगाल अभागिनी कशाला करूं ? श्रीकृष्णाच्या चिरसंगमानं परमपावन झालेल्या राधेचं मला अगदीं दुरून दर्शन झालं, तरी माझ्या सुदवाची सीमा झाली, असं मी समजेन. राधा ! श्रीराधा !

**मुष्टिक** ( स्वगत )—काय नामी कल्पना डोक्यांत चमकली एकदम ! त्या राधेचं हुबेहुब रूप घेऊन या बटकीच्या पोरीला पुरं फसवावं आणि ताब्यांत घ्यावी कायमची ! मी राजमल्ल असलों, माझी शक्ति अचाट असली, तरी माझा चेहरा, माझा बांधा, माझा ठेंगणेपणा, एखाद्या स्त्रीला शोभण्यासारखा आहे, असं

महाराज नेहमीं विनोदानं म्हणतात. दैवाच्या या कृपेचा फायदा करून ध्यावा या वेळीं. केशीबरोबर गोकुळाला जाऊन कांहीं तरी युक्ति लढवून राधेला नीट बघून यावं, आणि मग आपली ही अचाट युक्ति गुपचुप अमलांत आणावी. भोळे कुब्जे, गोकुळच्या कृष्णापूर्वी मथुरेच्या या राधेच्याच जाळ्यांत तूं अचूक सांपडणार!

[ जातो.

**कुब्जा**—भाग्यशाली राधादेवि, जन्मजन्मांतरीं तूं अपार पुण्यं संपादिलीं होतींस, म्हणून कृष्णदेवाच्या अष्टौप्रहर प्रेमसंगमाचा अलभ्य लाभ तुला झाला!

[ राग–पहाडी; ताल–केरवा; चाल–करम दिया मोरि० ]·

**भाग्यवती भुवनांत ललना। तुजसम बहु धन्या दिसेना ॥ ॥ ध्रु० ॥ निरखोनि जया विश्व सुधा वरि। दे तुज तो स्वमना समाना ॥ १ ॥ चिर सहवासा घे रमणाच्या। निरवधिसुखसदना वरेण्या ॥ २ ॥** [ जाते.

---

## प्रवेश तिसरा

[ अनयाच्या वाड्यांतील एक महाल. अनय सचित प्रवेश करतो. ]

**अनय**—चंद्रिकेनं परवां कुंजवनांत प्रत्यक्ष पाहिलेला तो प्रकार! अरेरे! अंगाचा कसा नुसता भडका होतो आहे! कांहीं सुचत नाहीं. नंदराजानं कृष्णाच्या स्वैर वर्तनाला आळा घालावा, म्हणून मीं आपणांकडून शिकस्त करून पाहिली. पण त्या बाबतींत त्या दोघांचं आणि या अवदसेचं पुरं संगनमत झालेलं दिसतं. नंद मलाच उलट मोठमोठया वेदांताच्या गोष्टी सांगूं लागला! ( सुस्कारा सोडून) मथुरेचा आश्रय घेतल्यावांचून मला आतां गत्यंतर नाहीं. जन्मभूमीचा द्रोह—स्वजनांचा द्रोह—यापेक्षां दुसरं घोर पाप एकही नाहीं, हें मला समजतं; पण सुडाच्या विचारापुढं प्रत्यक्ष व्यवहारांत तें उमजत मात्र नाहीं! तें कांहीं नाहीं! त्या पापी चांडाळणीचं तोंड पहाणं हें जसं मीं परवांपासून टाळलं आहे, तसंच सूडाशिवाय दुसरा कसलाही विचार करणं मला आतां टाळलंच पाहिजे. कंसाच्या क्रोधाग्नींत कृष्ण आणि नंद यांची पूर्णाहुति पडेपर्यंत आतां दुसरा विचार म्हणून करायचा नाहीं! कृष्ण–राधेच्या स्वैर वर्तनानं उत्पन्न झालेल्या त्वेषाच्या भरांत आईनं कृष्णजन्माचा जो विलक्षण गौप्यस्फोट केला, त्याच्या साहाय्यानं मी या पापी जोडीचा पुरा निःपात करणार! आजच्या दरबारांत या गौप्याच्या जळत्या

पालित्यानं पुरी आग भडकावून देतों, आणि तीच जळतजळत या दोघांपर्यंत आणून धडकावतों! ( सुस्कारा टाकून ) पण, हें गोकुळ, माझी राधा-नको; त्या पापिणीबद्दल तरळता विचार सुद्धां आतां नको. अरे पण ही-नको तेंच-( तोंड फिरवून उभा राहतो. राधा प्रवेश करते. )

**राधा**—हें काय बरं असं? परवांपासून पहाते आहे, घरांत यायचं नाही—बाहेर बाहेरच असायचं. दोनतीनदां संधि पाहून बोलण्याचा मीं यत्न केला, तर मला धुडकावून घरांतून निघून जायचं! असं कां बरं? माझा राग आला आहे? होय गडे? ( अनय तिच्याकडे न पहातां त्वेषाने जाऊं लागतो. त्याला अडवून ) मी नाहीं गडे जाऊं द्यायची अशी! मी पायां पडतें; नाक घांसते हो! माझा राग का आला आहे?

**अनय**—भलतंच! तुझ्यासारख्या परम पवित्र पतिव्रतेबद्दल राग? तुझ्या पातिव्रत्याचं झळझळीत तेज सहन होईनासं झाल्यामुळं मी हा असा तुझ्या-पासून दूरदूर रहातों आहें!

**राधा**—असं कां बरं हें उपरोधिक बोलणं? काय असा अपराध झाला माझ्या हातून? कुणी तरी दुष्टानं, माझ्याबद्दल इकडच्या कानांत जलाल विष ओतलं आहे खास!

**अनय**—दुसरा कोण कशाला नाहक विष ओतील? जगांतील तीव्र विषांचा दाहक अर्क ओतून तूंच, राधे, तूंच माझं हृदय जाळून पोळून खाक करून टाक-लंस! राधे, आतांपर्यंत तूं माझं हृदय होतीस ग!

[ राग-हमीर; ताल-आडाचौताल; चाल-कहत सुनत० ]

**मधुर मधुर जन मज नव नव। प्रतिविपला प्रिय संगमिं तव ॥ ध्रु० ॥ मम तव मन एक सदा। भिन्न न ते नयन कदा। स्वर्गसम गमत अमृतभरित मधु भव ॥ १ ॥**

जा—आपलं काळं तोंड मला दाखवूं नकोस. त्या कपटी काळ्याच्या काळतोंडाशीं त्याची चांगली तोंडमिळवणी होईल.

**राधा**—काय भलतेच विपरीत शब्द हे? महाराज, मी आपणाला एकच सांगतें, कीं माझं पातिव्रत्य मेरूप्रमाणं अढळ आहे आणि आमरणांत तें अढळ राहील. याला एक परमेश्वरच साक्ष आहे.

**अनय**—तुझा परमेश्वर म्हणजे तो काळा फत्तर! वा! फारच उत्तम!

**राधा**—नाहीं नाथ, नाहीं! माझे परमेश्वर आपण! आपल्या हृदयांतला परमेश्वर साक्ष आहे कीं माझं पातिव्रत्य तिळमात्रहि विचलित झालं नाहीं. त्याप्रमाणंच, श्रीकृष्णहि पूर्ण निष्पाप आहे.

**अनय**—अगदीं तुझ्याप्रमाणं! जमलं! तूं पवित्र पतिव्रता, तो पूर्ण निष्पाप! दोन पवित्र तरुण माणसांनीं एकांत कुंजमंदिरांत, रात्रीबेरात्रीं हवा तो पवित्र गोंधळ घालावा, आणि थांग ना पत्ता, अशा अदृश्य परमेश्वराची त्याबद्दल साक्ष नेमून मोकळं व्हावं! राधे, त्या काळ्याच्या काळतोंडांची काळोखी संसर्गानं आपल्या तोंडाला लावून घेतलीस आणि माझंही तोंड काळं केलंस! हाय हाय! नको, आतां विचाराचं नांव नको-त्याप्रमाणं तुझं तोंडहि पहाणं नको! [ जातो.

**राधा**—परमेश्वरा, नाथांशी चालविलेल्या मुग्ध वर्तनाबद्दल मला क्षमा कर. प्रयत्नांची पराकाष्ठा करून माझ्या पातिव्रत्याबद्दल नाथांची खात्री करण्याची वेळ ही नव्हती. स्वारीचा पोशाख दरबारी आहे. तर्क केल्याप्रमाणं सकाळींच हें मथुरेला निघाले, हें खास! आजच्या दरबारांत श्रीकृष्णाबद्दल हे फिर्याद करणार, यांत शंका नाहीं. देवा, या साऱ्या गोष्टींचा परिणाम श्रीकृष्णाच्या जगन्मंगलमंदिराची उभारणी होण्याकडेच होऊं दे. माझ्या या कृतीमुळं माझ्या वांट्याला कांहीं पुण्यांश येणार असला, तर तो नाथांच्या भाग्याला जाऊं दे, आणि दोषांचा वांटा मात्र मला दे.

[ राग-भीमपलास; ताल-एकताल; चाल-लचक लचक० ]

**तिमिरपटलभार विपुल करि वसुधा व्याकुल हा ॥ ध्रु० ॥**
**अरुणोदय कान्त शान्त वांछि भुवन आर्त महा। अमरविभवि उदयाचलिं त्या विलसे कृष्ण अहा!॥ १ ॥**

[ जाते.

---

## प्रवेश चवथा

[ यमुनेच्या तीरावरील तमालवन. केशी आणि सुनाम बोलत प्रवेश करतात. ]

**केशी**—त्याबद्दल तूं तिळमात्रही काळजी करूं नकोस. या नाहीं त्या निमित्तानं कंसमहाराजांच्या या कट्टया शत्रूला मी आज यमाच्या दरबारीं पाठविल्याशिवाय रहात नाहीं.

**सुनाम**—आणि कृष्णानं आजच्या दरबारला येऊन कंसमहाराजांना प्रणाम करण्याचं कबूल केलं तर? तसं त्याला करायचं नसतं, तर मुद्दाम आपल्या बंधूला पाठवून इथं यायची त्यानं आपल्याला विनंति केली नसती.

**केशी**—तूं म्हणतोस ते मलाहि खरं वाटतं. या केशीच्या अलौकिक पराक्रमाची ख्याति त्या भेकडाच्या कानांवर जाऊन त्याची छाती अगोदरच हबकून गेली असावी! माझ्यासारखा त्रिभुवनविजयी वीर प्रतिज्ञा करून आपणावर चालून येत आहे, या बातमीनं त्याच्या छातीच्या हाडांचा चुरा होऊन गेल्याशिवाय कसा राहील? सुनाम, कृष्णानं महाराजांच्या दरबारीं येऊन त्यांना प्रणाम करण्याचं कबूल केलं, तरी या वज्रमुष्टीच्या दारुण प्रहारानं तो आज जमीनदोस्त होणार! कृष्ण आमची अट कबूल करो वा न करो—जिवंतपणीं कंसमहाराज समोर मस्तक लवविण्याचा गौरवास्पद मान त्याच्या कपाळीं नाहीं!

**सुनाम**—तर मग कृष्णाच्या बंडखोर आयुष्याचा आजचाच शेवटचा दिवस म्हणायचा!

**केशी**—सुनाम, कृष्णाच्या मस्तकावर आदळलेल्या या वज्रमुष्टीच्या दारुण प्रहारानं थोड्याच वेळांत हा गिरिराज गोवर्धन, ही कालिंदी आणि हें शांत तमालवन अगदीं दणाणून जाईल, आणि त्याच दुंदुभिरवानं कृष्णवधाची बातमी तुमच्या आणि मथुरेच्या लोकांच्याही कर्णरंध्रांत दुमदुमेल! (सुनाम प्रणाम करून जातो.) आतां प्रत्यक्ष काळ आला तरी—(कृष्ण प्रवेश करतो.) कृष्णा बोल—अधिक वाटाघाटीची जरूर नाहीं. मथुराधिपतींना प्रभु समजून तूं त्यांना प्रणाम करायला तयार आहेस कीं नाहीं?

**कृष्ण**—केव्हांही! मथुराधिपति माझे परमपूज्य प्रभु आहेत. त्यांना प्रणाम करण्याचं नाकारून मी प्रभु-द्रोहाचं पातक कसं करूं?

**केशी**—अस्सं! माझ्या जरबेचं झणझणीत अंजन डोळ्यांत पडलं, तेव्हां शुद्धीवर आलास म्हणायचा! मग मथुरेच्या गादीशीं आजवर निमकहरामपणा बंडखोरी कां चालविली होतीस?

**कृष्ण**—कोण निमकहराम? कोण बंडखोर? नसेनसेंतून वहाणारा रक्ताचा थेंब ना थेंब मथुरेच्या गादीच्या कल्याणासाठीं सांडणारे आम्ही राजनिष्ठ प्रजाजन निमकहराम? मथुरेच्या खऱ्या अधिपतीला-उग्रसेनमहाराजांना प्रत्यक्ष ईश्वर समजून आपल्या हृदयाच्या फुलांनीं त्यांची पूजा बांधणारे आम्ही बंडखोर? अन्या-

यानं, कपटानं, पशुबलानं उग्रसेनमहाराजांची त्यांच्या मालकीच्या सिंहासनावरून उचलबांगडी झाली असतां मथुरेच्या राजलक्ष्मीचं विकट वैधव्यरूप पाहून रात्रं-दिवस हृदयांतील रक्ताचे अश्रु ढाळणारे आम्हीं हरामखोर ? आणि प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या पित्याला-राजाला-प्रभूला त्याच्या न्याय्य अधिकाराच्या सिंहासनावरून हात धरून खालीं ओढणारा, कुलकलंक चांडाळ-तो तुमचा ईश्वर ? त्याला प्रभु समजून मी प्रणाम करूं ? त्यापेक्षां नरकांतल्या एखाद्या सडक्या किड्याला-

**केशी**—चूप रहा हरामखोरा ! आतां कंसमहाराजांच्या निंदेचं एक अक्षर तोंडावाटे काढशील, तर तुझी ती बंडखोर जिव्हा छाटून टाकीन ! न्यायान्यायाच्या गोष्टी तुमच्या तोंडीं कशाला ? बैलाच्या मानेवरचं जोखड सावाच्या घरच्या लांकडाचं असो, नाहीं तर चोराच्या घरच्या लांकडाचं असो ! त्याचा विचार त्या बैलांना कशाला हवा ?

**कृष्ण**—केशी, परमेश्वरस्वरूप जनतेच्या निंदेचं एक अक्षरहि मी ऐकणार नाहीं.

**केशी**—इतकी तसदी तुला कशाला ? मीच तें ऐकायला तुला जिवंत ठेवीत नाहीं. (कृष्णाचें व केशीचें मल्लयुद्ध सुरूं होतें. इतक्यांत राधा वेगानें प्रवेश करते.)

**राधा**—शाबास ! श्रीकृष्णा, शाबास ! ( कृष्णाच्या एका प्रचंड वज्रमुष्टिप्रहारानें केशी मरतो. कृष्ण राधेला प्रणाम करतो.) शाबास ! वीरा, शाबास ! तुझ्यावरून पंचप्राणांची मंगल पंचारति ओवाळून काढीन ! केशी एवढा विख्यात वीर; पण त्याचाहि यमधर्म तूं झालास ! अहाहा ! हा पहा वीरश्रेष्ठ केशव विजयोत्सवानं धरित्री कांपवितो आहे !

[ राग-शंकरा; ताल-त्रिताल; चाल-सुमरन तेरि रजा० ]

**केशव हा गमला । देवेन्द्र जणुं वधितां वृत्रासुराला ॥ध्रु०॥**
**पापहरा मुदितचित्ता या अभिवंदीं कीं अचला ॥ १ ॥**

[ पडदा पडतो. ]

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ मथुरेच्या राजवाड्यांतील दरबारचा दिवाणखाना; किताबतीचा दरबार भरला असून प्रमुख स्थानीं कंस विराजमान झाला आहे. योग्य जागीं शिशुपाल, शाल्व वगैरे राजे, मथुरेचे मांडलिक आणि अक्रूर, कंक, अंधक, सत्यक, वसुदेव वगैरे सरदार बसले आहेत. नृत्यांगनांचें गायन-नर्तन चालू आहे. ]

**नृत्यांगना—**

[ राग–मांड; ताल–केरवा: चाल–जाव जाव सैयां० ]

**राजराज ! करि तुज आजि मोदें विश्व वंदना । प्रबल आजि जनपद नव बांधी भावबंधना ॥ ध्रु० ॥ शत वसंत तुज आयु निरामय देवो शमासि महा । प्रभु तो लोकनंदना ॥ १ ॥**

**शिशुपाल**—शाल्वादि भूपाल, मथुरेचे मांडलिक आणि सरदारहो, आजचा हा प्रसंग अनेक दृष्टींनीं अगदीं अपूर्व आणि संस्मरणीय असा आहे. आपल्या भाग्याच्या बलावर कंसमहाराजांनीं आयुष्याचीं पन्नास सुखमय वर्षे उपभोगिलीं असून आज ते एकावन्नाव्या वर्षांत पाऊल टाकीत आहेत. या प्रसंगीं कंसमहाराजांचे श्वशुर–भूलोकचे केवळ देवेन्द्रच असे मगधाधिपति सम्राट् जरासंधमहाराज यांनीं कंसमहाराजांना ‘ महामंडलेश्वर ’ ही अत्यंत मानाची पदवी अर्पण करण्याचं निश्चित केलं असून, त्या पदवीची महावस्त्रं आणि सार्वभौमराजाचिन्हांकित मुद्रालेख बरोबर देऊन मला गिरिव्रजाहून मुद्दाम पाठविलं आहे. ‘ महामंडलेश्वर ’ या पदवीचं महत्त्व आणि मान हीं फार मोठीं आहेत. या पदवीमुळं कंसमहाराज मगधसाम्राज्याचे प्रमुख मांडलिक झाले असून साम्राज्याचे मुख्य सेनापतिहि आतां तेच झाले आहेत. या पदवीमुळंच सम्राट् जरासंधमहाराजांनंतर मगधाच्या सार्वभौम सिंहासनावर महाभाग्यशाली कंसमहाराज विराजमान होऊन आपणां

सर्वांचे प्रभु होतील. या थोर भाग्याला आणि अत्यंत सन्मान्य पदवीला योग्य असा कंसमहाराजांइतका भाग्यशाली पुरुष सर्व पृथ्वीतलावर सांप्रत एकही नाहीं. त्यांचा आतांपर्यंतचा महापराक्रमी आयुष्यक्रमच माझ्या म्हणण्याची साक्ष देत आहे. साम्राज्याचे महामंडलेश्वर या थोर पदवीचा स्वीकार करतांना, या प्रसंगीं, आपणां सर्वांचा मंगलाशीर्वाद आणि अनुमति कंसमहाराजांना मिळावी, अशी सम्राट् जरासंधमहाराजांच्या वतीनं मी आपणां सर्वांना विनंति करतों.

**कंस**—चेदिराज शिशुपालमहाराज, शाल्वादि नृपाल, मांडलिक आणि सरदारहो, आजच्या या अत्यानंदाच्या प्रसंगीं माझे परमपूज्य प्रभु आणि श्वशुर मगधाधिपति सम्राट् जरासंधमहाराज यांचा थोर अनुग्रह आणि आपणा सर्वांचं माझ्यावरील निःसीम प्रेम, यांच्या प्रचंड भाराखालीं माझं अंतःकरण दडपून गेल्यामुळं, माझी कांहीं विलक्षण स्थिति झाली आहे. माझे परमपूज्य प्रभु जरासंधमहाराज यांचे माझ्यावर इतके उपकार झाले आहेत, कीं माझ्या आयुष्याचं पळ ना पळ त्यांनी व्यापलं आहे. आज जे मी हें देवेंद्रतुल्य वैभव उपभोगीत आहें ते केवळ जरासंधमहाराजांच्या कृपेचंच फळ आहे. माझ्या गृहसौख्याचेहि जनक तेच आहेत. परमेश्वर म्हणून कुणी आहे कां नाहीं, तें मला ठाऊक नाहीं; परंतु सम्राट् जरासंधमहाराज हेच माझे परमेश्वर आहेत, असं मी निःशंक म्हणतों. सम्राट्महाराजांची कृपा पूर्णपणं फळाला येवो आणि मी आपल्या उच्च पदाला योग्य ठरों, इतकंच माझं आपणां सर्वांजवळ मागणं आहे.

**शिशुपाल**—भूपालवृंद, मथुरेचे सर्व मांडलिकहो—

**सत्यक** ( मध्येच उठून )—राजाधिराज, मथुरेच्या मांडलिकांपैकीं गोकुलाधिपति नंद हा सर्वांत प्रमुख असून तो या सिंहासनाच्या अत्यंत गौरवाच्या प्रसंगीं नजराणा घेऊन कां हजर नाहीं ? नंदकुमार श्रीकृष्ण या समारंभाला हजर रहाणार आहे, अशी चोहोंकडे बोलवा होती. परंतु तोही कुठं दिसत नाहीं.

**कंस**—गोकुलाधिपति नंद हा आमचा अत्यंत राजनिष्ठ मांडलिक असून त्याचा तरुणबांड, मिसरूडही न फुटलेला उनाड पोरगा कृष्ण हा आमच्याविरुद्ध कांहीं टुरटुर करीत असतो, हे सर्वांना विदितच आहे. प्रचंड सैन्य पाठवून सारं गोकुळच्या गोकुळ उध्वस्त करून टाकणं आमच्या बाहुबलाला अशक्य नव्हतं-परंतु वृद्ध नंदाच्या राजनिष्ठेकडे पाहून, एका उद्दाम गाढवाच्या बंडखोर लाथाळीमुळं साऱ्या गोकुळावर गाढवांचे नांगर फिरविणं मथुरेच्या गादीला शर-

मिंदेपणाचं वाटलं. आजच्या गौरवप्रसंगीं 'नंदाच्या बंडखोर कारट्याला जिवंत अगर मृत आणून कंसमहाराजांसमोर त्याची मगरूर मान वांकवीन, अशी घोर प्रतिज्ञा करून, माझा केवळ प्राण असा माझा प्रियबंधु युवराज केशी, काल संध्याकाळींच गोकुळला गेला असून, आपली प्रतिज्ञा पूर्ण केल्याशिवाय तो रहाणार नाहीं. तेव्हां सत्यकादि आमच्या गादीच्या हितचिंतकांनी चिंतातुर होण्याचं कांही कारण नाहीं. युवराज केशी येतांच—

[ सुनाम रडत रडत धांवत येतो. ]

**सुनाम**—महाराज, आतां कुठला केशी ? केशी गेला—

**कंस**(आश्चर्यानें)—केशी गेला ? काय म्हणतोस तूं हें ? सांग सुनाम, सांग, केशी कुठं गेला ?

**सुनाम**—कृष्णानं पाठविलं तिकडे ! शकट, तृणावर्त, बक, इत्यादि मथुरेचे वीर गेले तिकडेच-त्यांच्या भेटीला !

**कंस**—काय म्हणतोस ? केशी गेला ? माझा युवराज गेला ? युवराज, युवराज—( दोन्ही हातांनी तोंड झांकून घेतो.)

**शिशुपाल**—काय म्हणतां ? कृष्णानं केशीला ठार केलं ?

**सुनाम**—होय महाराज ! ही अशुभ बातमी घेऊन यायचं या अभाग्याच्या कपाळीं आलं आहे.

**कंस**—केशी, बाळा, काय केलंस हे ? प्रतिज्ञा करून गेलास काय आणि शेवटीं हें केलंस काय ? केशी, केशी—मथुरेच्या गादीच्या, आपल्या घराण्याच्या आणि माझ्या भावी उत्कर्षाचीं भडक कल्पनाचित्रं काढून आम्हांला मोठमोठ्या आशा दिल्यास काय, आणि त्यांपैकीं एकहि प्रत्यक्षांत उतरलेली न पहातां, तातडीनं स्वर्गसुख भोगायला एकटाच निघून गेलास काय ! केशी-युवराज—

**शिशुपाल**—महाराज, काय हें ? ज्यानं कपटानं आपल्या प्रिय बंधूचा निःपात केला, त्याचा समूळ उत्खात करण्याची प्रतिज्ञा करून ती पार पाडण्याच्या ताबडतोब प्रयत्नाला लागा. गोकुळ जाळूनपोळून उध्वस्त करून टाका आणि त्याच्यावरून गाढवांचे नांगर फिरवा.

**कंस**—शिशुपाल, तुम्ही, शाल्ववसुदेवादि मथुरेच्या गादीचे सरदार यांना साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा करतों, कीं ज्यानं कपटानं माझ्या केशीचा वध केला, त्याचा पूर्ण निःपात हा महोत्सव आटोपण्याच्या आंत मी करीन. असं मी न करीन,

तर पूर्वींच्या एकवीस आणि पुढच्या एकवीस पिढ्यांसह मी अक्षय रौरवनरकांत पडेन!

**शिशुपाल**—महाराज, प्रतिज्ञेचा हा एक भाग झाला. आतां दुसरा भाग—

**कंस**—चेदिराज, नंद हा मथुरेचा अत्यंत राजनिष्ठ मांडलिक आहे, तेव्हां—

[ अनय एकदम प्रवेश करतो. ]

**अनय**—राजाधिराज, नंदाची इतकी कींव करण्याचं कारण नाहीं. नंद दिसतो तसा नाहीं, हें सिद्ध करण्यासाठींच मी या दरबारला आलों आहें.

**कंस**—अनोळखी तरुणा, तूं कोण आहेस आणि हें काय सांगतो आहेस?

**अनय**—महाराज, आपला कट्टा वैरी जो कृष्ण, तो माझाहि वैरी आहे. एवढी माझी ओळख, मला वाटतं, आपणाला पुरेशी आहे. मी गोकुळांतला एक सरदार आहे. माझं नांव अनय. नंदाचा तोतया मुलगा कृष्ण—

**कंस**—तोतया मुलगा! म्हणजे—

**अनय**—तेंच सांगायला, महाराजांच्या पायांपाशीं मी आलों आहे. कृष्णाचे अपराध अतिशय खासगी स्वरूपाचे असल्यामुळं या जाहीर दरबारांत त्यांचं स्वरूप मला जाहीर करतां येत नाहीं. त्यासंबंधानं महाराजांनीं कृपावंत होऊन मला थोडा वेळ एकांतीं भेट द्यावी, अशी चरणांपाशीं विनंति आहे.

**शिशुपाल**—अनय, खासगी तक्रारी ऐकण्यासाठीं हा दरबार भरलेला नाहीं. त्यासाठीं महाराज तुम्हाला लवकरच स्वतंत्र मुलाखत देतील.

**कंस**—तरुणा, कृष्ण कोण हें एकदम सांग.

**अनय**—महाराज, कृष्ण हा नंदाचा औरस पुत्र नाहीं. कृष्ण प्रत्यक्ष आपला भाचा आहे!

**कंस**—काय म्हणतोस? म्हणतोस तरी काय?

**वसुदेव**( स्वगत )—निष्ठुर दुर्दैवा! काय केलंस हे!

**अनय**—कृष्ण हा महाराजांचा भाचा—वासुदेव आणि देवी देवकी यांचा तो आठवा पुत्र! त्रिकालदर्शी नारदांनी वसुदेव-देवकी यांच्या ज्या आठव्या पुत्राच्या हातून महाराजांचं अत्यंत अनिष्ट होणार, असं भविष्य वर्तविलं आहे, तोच हा त्यांचा आठवा पुत्र!

**कंस**—कृष्ण वसुदेवदेवकींचा आठवा पुत्र?

**अनय**—होय राजाधिराज! सतरा वर्षांपूर्वी मथुरेमध्यें महाराजांच्या बंदि-

शाळेंत देवी देवकीच्या पोटीं कृष्णाचा जन्म झाला. त्या वेळीं काय गफलत झाली ती कळली नाहीं. परंतु कृष्णाला घेऊन ऐन मध्यरात्री वसुदेव बंदिशाळेंतून निसटला तो गोकुळांत नंदाच्या घरीं आला नंद हा वसुदेवाचा परमस्नेही असून,त्याच दिवशीं कर्मधर्मसंयोगानं त्याची बायकोही प्रसूत झाली होती. माझी माता त्या वेळी यशोदेच्या जवळ धात्री असून तिच्याशिवाय मूर्च्छितप्राय यशोदेजवळ कोणीहि माणूस नव्हतं. वसुदेवानं आपल्या पुत्रावरील भयंकर प्राणसंकट माझ्या मातेच्या कानांवर घालून त्या सुंदर मुलाला वांचविण्यासाठीं तिची करुणा भाकली. माझ्या मातेचं कोंवळं हृदय वसुदेवांच्या वृत्तांतानं तत्काल द्रवलं आणि त्याच्या म्हणण्याला ती कबूल झाली. आपल्या मुलाला नंदाच्या घरीं ठेवून, नंदाची नुकतीच जन्मलेली मुलगी मुलाऐवजीं बरोबर घेऊन, वसुदेव तत्काल मथुरेला परत आला. कंसमहाराजांचं शत्रुत्व आपल्या मुलांशीं; मुलीला ते मारणार नाहींत, अशी हमी माझ्या मातेला वसुदेवानं दिली होती. म्हणूनच माझी आई अशा स्वामिद्रोही कृत्याला संमत झाली. पुढचा इतिहास सर्वांना विदितच आहे. माझ्या मातेनं सतरा अठरा वर्षं ही गोष्ट अगदीं जित्राच्या पलीकडे गुप्त ठेविली होती. ती नुकतीच कांहीं कारणामुळं, त्वेषाच्या भरांत, तिच्या तोंडून बाहेर पडली. कृष्णासारख्या महाराजांच्या कट्टया प्राणशत्रूला नंदानं आपल्या घरांत पोसून वाढविला; इतकंच नव्हे, तर त्याच्या सर्व दुष्ट कृतींवर तो मायेचं पांघरूण घालतो आहे; यावरून त्याची राजनिष्ठा किती पोकळ आणि दिखाऊ आहे, हें महाराजांच्या ध्यानीं येईलच !

**शिशुपाल**—अनय, तूं सांगितलेला हा इतिहास अत्यंत अद्भुत आहे, यांत संशय नाहीं. परंतु तो खरा आहे, याला पुरावा काय ?

**अनय**—दुसरा आणखी कोणता पुरावा पाहिजे ? वसुदेव सत्यवचनी असल्याबद्दल त्यांची ख्याति आहे. मी सांगतो हा इतिहास सत्य आहे कीं नाहीं, याबद्दल आर्य वसुदेवच साक्ष देतील.

**शिशुपाल**—वसुदेव, हा अनय सांगतो तो कृष्णजन्माचा इतिहास खरा आहे काय ?

**वसुदेव**( खालीं मान घालून )—होय महाराज !

**कंस**--दुष्टा, हे शब्द उच्चारतांना तुझी ती कृतघ्न जीभ गळून कशी पडली नाहीं? हा अपारसत्ताधारी कंस केवळ आपल्या भगिनींच्या संतोषासाठी तुझ्याशीं अत्यंत प्रेमभावानं आणि बरोबरीच्या नात्यानं वागत असतां, तूं त्याच्याशीं असा

कृतघ्नपणानं वागलास ? माझ्या मृत्यूनं तुझ्या अधम पुत्राला मथुरेच्या सिंहास-सनाचा लाभ होईल, अशी तुझी कल्पना असेल, तर ती अगदीं फोल आहे ! तुमच्या साऱ्या यादवकुळाचा निःपात करून, त्यांच्या घरांदारांवरून गाढवांचे नांगर फिरविल्याशिवाय हा कंस यापुढें क्षणाचीही विश्रांति घेणार नाहीं ! तुझ्या दुष्ट कारस्थानांत साहाय्य करणाऱ्या तुझ्या त्या नीच मित्राचं—नंदाचं गोकुळही मी जाळून पोळून उध्वस्त करून टाकीन ! दुष्टा, तूं माझ्याशीं कितीही कृतघ्नपणानं वागलास, तरी देवकीकडे पाहून मी तुला क्षमा करतो. मात्र आपल्या कृतकर्माचा पश्चात्ताप करायला तुला हवा तेवढा अवकाश आणि स्वस्थता मिळावी म्हणून, मी तुला जन्मपर्यंत कारागृहाच्या एकांतवासांत नीट बंदोबस्तानं ठेवणार आहें. देवकीवर माझं इतकं प्रेम आहे, कीं मी तिला पतिवियोगाचं दुःख पळभरही भोगूं देणार नाहीं. तुझी जन्माची सोबतीण तुझ्याबरोबरच कारागृहांत येईल ! सुनाम, या दुष्ट कृष्णसर्पाला आतांच्या आतां घेऊन जा आणि तुरुंगांतल्या अंधारकोठडींत देवकीसह याला डांबून टाक. ( सुनाम वसुदेवाला बंदिवान् करून घेऊन जातो.) सभ्यजनहो, झाला हा प्रकार अत्यंत खेदजनक आणि अनिष्ट झाला, हें खरं; परंतु आपण सारे न्यायान्याय जाणणारे आहांत. माझ्या या वर्तनांत कांहीं दोष आपणाला दिसत असेल तर सांगा.

**अंधक**—कंसा, न्यायान्यायाचा प्रश्न मोठ्या दिमाखानं सभासदांना करतोस? कंसा, आजपर्यंत तूं जीं अनन्वित पातकं केलींस, जे भ्रष्टाचार माजविलेस, जे भयंकर जुलूम केलेस, त्यांच्या मानानं निरपराध वसुदेवाला बंदींत घालण्याचं पातक जरी क्षुद्र भासलं,तरी तुझ्या पातकांच्या कांठोकांठ भरलेल्या प्याल्यामध्यें तो शेवटचा अधिक पापबिंदु होणार आहे ! अरे, वसुदेवाचा असा अपराध तरी कोणता झाला ? आपल्या सहा निरपराध तान्हुल्यांना निःसीम क्रूरतेनं ठार मारल्याबद्दल तुझा वध न करतां आपल्या आठव्या मुलाला वसुदेवानं तुझ्या द्वेषवन्हींतून वांचविलं, हाच ना त्याचा अपराध? अधमा, जन्मदात्या पित्याचा हात धरून सिंहासनावरून त्याला जबरदस्तीनं ओढून काढणाऱ्या तुला कर्मचांडाळाला बापाच्या प्रेमाची थोरवी काय कळणार ? मी तर म्हणतों, कीं तुझ्या दयाळु पित्यानं अपत्यप्रेमामुळं जन्मतांच तुला एखाद्या शिळेवर आपटलं नाहीं, यामुळंच आजवर जगाचे अनन्वित हाल झाले आहेत! कंसा, माझे हिताचे बोल ऐक. वसुदेवाचे पाय धरून, त्याची क्षमा माग. कृष्ण कपटी कपटी म्हणून नुसता जप करण्यांत

कांहीं अर्थ नाहीं. तो महाबुद्धिशाली असून अद्भुत पराक्रमीहि आहे. वसुदेव हा आपला पिता आहे, हें कृष्णाच्या कानांवर आतां गेल्याशिवाय रहाणार नाहीं. आपल्या पूज्य पित्याला बंदिवासांत टाकणाऱ्या शत्रूवर तो वेगानं धांवून येऊन त्याचा पुरा निःपात करील. कंसा, कृतज्ञतेच्या आणि प्रभुनिष्ठेच्या तूं मोठ्या गप्पा मारतोस, त्या उग्रसेनमहाराजांना गादीवरून खालीं ओढतांना तुला आठवत नव्हत्या काय ? तूं कुणाचा प्रभु आणि तुझ्याशीं कसली कृतज्ञता? मथुरेच्या गादी-चा आणि तुझा काय संबंध ?

**कंस**—अंधका, तुझ्या पांढऱ्या केंसांकडे पाहून तुला मी एकवेळ गय करतों; पण आतां एक शब्द बोलशील तर—

**अंधक**—काय शासन करशील ?

**कंस**—तुझी ती लुबलुब बोलणारी जीभ एकदम छाटून टाकीन !

**अंधक**—साऱ्या शरीराची तुझ्या क्रोधाग्नींत आहुति द्यायला मी तयार झालो असतां, नुसत्या जिभेची काय मातब्बरी ! मथुरेच्या गादीच्या कल्याणासाठींच जिचा मीं आजपर्यंत उपयोग केला, ती ही जीभ शब्दोच्चार करण्याची शक्ति असे-पयत, असेच शब्द उच्चारील, कीं ' कंसा, वसुदेवाला बंधमुक्त कर, कृष्णाला शरण जा; तोच तुला कुलासह अधःपातांतून वांचवील !'

**कंस**—सुनाम, या थेरड्याचे शब्द मला कधींही ऐकूं येणार नाहीत, इतक्या खोल तळघरांत याला नेऊन डांबून टाक !( चार जवान अंधकाला उचलून घेऊन जातात; जातांना तो ' कंसा वसुदेवाला बधंमुक्त कर ' इत्यादि भाषण पुनः म्हणतो.)

[पडदा पडतो.]

---

## प्रवेश दुसरा

[ राधेचा महाल. राधा साचिंत उभी आहे. ]

**राधा**—श्रीकृष्ण नंदमहाराजांचा पुत्र नाही ? काय ऐकलं मी हें ? श्रीकृष्णा च्या हातून विश्वमंगलाची योजना पार पडणार असं ध्वनित करणारा हा दैवी संदेशच आहे यांत शंका नाहीं. काल मथुरेंत घडून आलेल्या अभ्दुत घटनांमुळं श्रीकृष्णाचं डळमळणारं मन दृढ होऊन, त्याच्या हातून कंसाचा निग्रह आणि उग्र-सेनमहाराजांची पुनःप्रतिष्ठा खास घडून येणार ! एक मन असं ग्वाही देत अस-तांहि माझं दुसरं मानवी दुबळं मन भयानं कसं थरथर कांपतं आहे! माझ्या योज-

नेचा विपरीत परिणाम होऊन स्त्रीबुद्धि प्रलयकर असते, असा तर अनुभव जगाला येणार नाहीं ना ?

[ राग-बागेश्री; ताल-त्रिताल; चाल-सैय्यांके घर आन० ]

**का सकलहि जागिं घातुक योषा। विधि योजि तयां विश्व-विनाशा ? ॥ ध्रु० ॥ अनलज्वाला वीचि जलाच्या। प्रलयीं यांसम बल ना ध्वंसा ! ॥ १ ॥**

[ जाते.

---

## प्रवेश तिसरा

[ कुंजवनाचा एक भाग. कृष्णाच्या वेषानें चाणूर प्रवेश करतो. ]

**चाणूर**—इतकीं वर्षं तालीमबाजींत घालविलीं आणि त्यांत आजपर्यंत इतकीं निरनिराळीं रसायनं सेवन केलीं, पण या प्रेमरसायनाची सर त्यांपैकीं एकालाहि नाहीं ! हा कृष्णासारखा पोषाक तर हुबेहुब पैदा केला. माझ्या कृष्णाच्या सों-गाची रंगी तालीम करायला हा मी कुंजवनांत आलों आहें. अहाहा ! माझ्या या सोंगाला जर एखादी भोळसर गोपी खरोखरीच फसली, तर काय, दोहोंकडून माझा लाटच साधला ! कृष्णापेक्षां मी जरा उंचींत कमी आहें. या माझ्या नांच-पणाचा मला भारीच राग आला आहे ! पायांच्या फाजीलपणाच्या पायावर मला सुखाची जंगी इमारत उभारणं अधिक सोपं झालं असतं. चला, एखादी गोपी या कुंजवनांत येईपर्यंत पलीकडे जरा विश्रांति घेऊं. (बाजूला उभा रहातो. इतक्यांत राधेच्या वेषानें मुष्टिक प्रवेश करतो. )

**मुष्टिक**—प्रेमाची जादू मोठी विलक्षण आहे बुवा ! पुरुषासारखा पुरुष मी-नव्हे, पुरुषांतला पुरुष मी; पण या प्रेमामुळं मी अगदीं बायकांतली बायको बनलों आहें ! हो, राधा ही रूपानं बायकांतली बायको आहे; नाहीं तर काय ? मनांत योजल्याप्रमाणं ही तालीम चांगल्या रीतीनं पार पडली म्हणजे मिळविली.

**चाणूर**( स्वगत )—अरे बापरे ! ही तर राधा ! आतां प्रेमाचं नांव घेऊन करावीच बोलायला सुरवात.

**मुष्टिक**—अरे बापरे ! नको तेंच नशिबीं आलं ! हा तर कृष्ण ! आतां या काळ्याशीं बोलूं तरी काय ? लाजल्याचं मिष करून खालीं पहात रहावं झालं.

**चाणूर**—प्रिये राधे !—

**मुष्टिक**( स्वगत )—झालं माझं काम ! प्रत्यक्ष कृष्ण मला राधा समजतो आहे ! ( उघड ) काय नाथ ?

**चाणूर**( स्वगत )—झालं माझं काम ! प्रत्यक्ष राधा मला कृष्ण समजते ! ( उघड ) प्रिये राधे, आज तूं अशी दूरदूर कां ग ? मान फिरवून तूं एकसारखी त्या बाजूकडे काय पहाते आहेस ?

**मुष्टिक**—आपल्या मुखचंद्राच्या तेजाकडे किनई मला पहावतच नाहीं बाई!

**चाणूर**—प्राणेश्वरि, कां बरं आजच नाहीं बघवत ?

**मुष्टिक**—आपल्या चिंतनाच्या नादांत आज मेलं मला जेवणखाण दिखिल सुचलं नाहीं ! उपासानं माझ्या डोळ्यांवर कशी झांपड येते आहे ! भारी अशक्तपणा वाटतो आहे—

**चाणूर**—तर मग सुंदरि, माझ्या हृदयाचा आधार घे.

**मुष्टिक** ( स्वगत )—अगदीं हातघाईवर आलं प्रकरणं ! आतां ताबडतोब काढता पायच घेतला पाहिजे ! नाहीतर अंगावर बेतेल ! (उघड) नाहीं, तितकी कांहीं जरूर नाहीं वाटत. बरं,मी जातें आतां. नाहीतर तिकडून रागावणं होईल!

**चाणूर**—इतक्यांतच जातेस? जीवनेश्वरि, तुला उपास पडला असेल, परंतु त्याची बाधा झाली आहे मला ! मला भूक आणि तहान भारी लागली आहे.

**मुष्टिक**—भूक लागली असली, तर इथली फळं खावी. देऊं आणून ?

**चाणूर**—नको राधे, नको ! या निर्जीव फळांनी काय होणार ? माझी ही राक्षसी भूक केवळ तुझ्या प्रेमफलाच्याच सेवनानं शान्त होईल ! राधे, तुझ्या अधरामृतपानानंच मला आपली पखाली तहान शमवूं दे !

**मुष्टिक** (स्वगत)—अरे बापरे ! हा काळभैरव माझा चावा घेणार कीं काय? ( उघड ) कृष्णा, माणसानं कांहीं काळवेळ तरी पहावी—

**चाणूर**—वाः ! सायंकाळसारखी ही नामी वेळ असतांना भलत्याच शंका कसल्या घेते आहेस तूं? चल राधे, माझी तहान शान्त कर—

**मुष्टिक**—कृष्णा, काय हा भलताच अविचार? कांहीं विचार कर, विचार कर ! जीवितेश्वरा—

**चाणूर**—सुंदरि, हृदयवल्लभे, राधे ! तुझ्याबद्दलच्या सराख्या विचारामुळंच

मी आज अशा अविचाराला प्रवृत्त झालों आहें. राधे-राधे-माझी तुला अगदींच कशी ग दया येत नाही? तूं तर दयेची देवी आहेस!

**मुष्टिक**—कृष्णा, तूं अगदींच बेफाम झालास! मी जातें आतां. काळवेळ देखिल बघायचा नाहीं माणसानं म्हणजे काय? [जाऊं लागतो.]

**चाणूर**—राधे, अशी निष्ठुर होऊन जाऊं नकोस. (हात धरतो) अरे बापरे! काय हें राधेचं दांडगं मनगट! पहिलवानच आहे म्हणायची ही!

**मुष्टिक** (जोराने हात सोडवून)—कृष्णा, एक पाऊल पुढं येशील तर बालंपेच घालून ठार करीन तुला! (दंड थोपटून पवित्र्यांत उभा रहातो.) कुणी आलं तर काय म्हणेल?

**चाणूर** (स्वगत)—अरे बापरे! काय हा राधेचा मर्दानी जोर! (उघड) अग, अशी एकदम वर्दळीवर कां येतेस? या भलत्याच वेळीं कोण येतो आहे इकडे मरायला! राधे, प्राणेश्वरि, मला निष्ठुरपणानं अशी दूर लोटूं नकोस गडे! तुझ्या मी पायां पडतों.

**मुष्टिक** (नीट पाहून)—कृष्णा, आज तूं इतका ठेंगणा कांरे दिसतोस?

**चाणूर**—अग, उपासामुळं तुझ्या डोळ्यांवर झांपड येते आहे ना? त्यामुळं मी दिसत असेन तसा तुला! बाकी मी आहे उंचच! (पायांच्या पुढच्या चवड्यावर चालून दाखवितो.)

**मुष्टिक**(स्वगत)— अरे बापरे! हा तर माझा हाडवैरी चाणूर! काय पण याच्या सोंगाला फसलों मी! आतां बरा सांपडला आहे! चांगला कुबलून काढतों! (उघड) कृष्णा, जीवितेश्वरा, मी आजपर्यंत थट्टेनं ओढून चंद्रबळ आणिलं होतं हा! मला त्याबद्दल क्षमा करून हृदयाशीं स्थान दे.

**चाणूर**—ये, ये लाडके! (डोळे मिटून हात पसरून उभा रहातो; मुष्टिक त्याला खालीं पाडून खूब बडवितो.) ओय-ओय-ओय! अग काय हें राधे, तूं चालविलं आहेस तरी काय? तुझ्या थट्टेनं प्राण चालला माझा!

**मुष्टिक**—आज कृष्णाची कणीक चांगली तिंबून काढायची राधेला लहर लागली आहे! कृष्णा, आपल्या प्रियेची कोणतीही लहर पुरवितांना प्रणयी पुरुष प्राणांकडे पहात नाहींत! मार खातांना तूं आपल्या प्राणांकडे पहायचं नाहींस—

**चाणूर**—राधे, तूं उपाशीं असतांना देखील तुझा इतका जोर? (स्वगत) अरे, काय फसलों मी! ही राधा पुरुष आहे! अरे हा तर माझा हाडवैरी मुष्टिक!

( उघड ) राधे, साफ सांगतो, तूं राधा नाहींस !—

**मुष्टिक**—आणि मीही साफ सांगतों—तूं कृष्ण नाहींस !

**चाणूर**—मी कृष्णाच्या जातीचा-पुरुष तरी आहे ! पण तूं राधेच्या जाती-चाही नाहींस! तूं दुष्ट तोतया आहेस! दम धर! कंसमहाराजांना तुझे हे सगळे ढंग सांगतों. तुझं वर्म मला ठाऊक आहे. तूं एका बायकोच्या नादीं लागला आहेस.

**मुष्टिक**—काय, मी बायकोच्या नादी लागलों आहें ?

**चाणूर**—हो हो ! आणि हें सारं महाराजांना सांगून, बुचड्यासकट तुझी गर्दन उडवितों !

**मुष्टिक**—आणि मी देखील तुझे सारे ढंग त्यांच्या कानांवर घालून त्या मुकुटासकट तुझं डोकं अस्मानांत उडवितों. तूंही एका बायकोच्या नादाला लागला आहेस, आणि त्याकरतांच तुझी परीक्षा पहायला मी असा बायकोच्या वेषानं तुझ्या पाठोपाठ या कुंजवनांत आलों.

**चाणूर**( स्वगत )— काय शिंच्यानं वर्मी थाप मारलीन् ! ( उघड ) चल, उगीच प्रकरण वाढविण्यांत काय अर्थ ? आपण आपसांत तह करून टाकूं ! तूं यापकीं कुणाला कांहीं सांगूं नकोस, आणि मीही कुणाजवळ बोलत नाहीं.

**मुष्टिक**—कबूल—पण वचना ना अगदीं ? नाहीं तर पहा दोघांचींही डोकी जाऊं देत !

**चाणूर**—नाहींरे, हें घे वचन—

**मुष्टिक**—ठीक आहे. माझंही घे वचन !

[ जातात

---

## प्रवेश चवथा

[ यशोदेचा महाल. यशोदा सुखासनावर बसली असून जवळ तिची दासी वारिणी उभी आहे. ]

**यशोदा**—वारिणि, जा बाई, फिरून एकदां शोध घेऊन ये अजून कान्हा आला कीं नाही तो ? राधेकडे पाठविलेली ती कौमुदी आली का ?

**वारिणी**—होय बाईसाहेब, अजून कांहीं युवराज तिकडे देखिल आले नाहींत, अशी वर्दी देऊनं ती आतांच गेली.

**यशोदा**—बरं, दृष्ट काढायचं आणि लिंबलोणाचं सारं साहित्य तयार आहे ना ? पंचारतींत तेलवाती नीट घालून ठेवल्या आहेसना ?

**वारिणी**—होय बाईसाहेब ! पण दृष्टीच्या साहित्याची जरूरच आहे, असं आपणाला कां वाटतं? राजबिंड्या युवराजांची दृष्ट काढायला आमच्या हृदयांच्या कुरवंड्या नेहमींच तयार असतात. प्रत्येक दृष्टीला त्यांची दृष्ट आम्ही मनांतल्या मनांत काढीत असतों बाईसाहेब !

[ राग-जिल्हा जंगला; ताल-केरवा; चाल-मग रोको ना० ]

**मन जाणे ना गुणांचा कान्हा कुणीं निर्मिला। हा !! ध्रु० ॥**
**गुणचंद्र वितरी लोका शांतिला सुखाला। हा ॥ १ ॥ नच**
**यासि कांहीं माया भेदितां मनाला। हा ! ॥ २ ॥**

**यशोदा** ( हंसून )—माझा कान्हा आहेच तसा ! पहातां पहातां त्याला एखाद्याची दृष्ट लागायची !

**वारिणी** ( स्वगत )—त्यांची मात्र आम्हांला दृष्ट लागते पहातां पहातां !

**यशोदा**—बरं वारिणि, तूं गच्चीवर जाऊन टेहळणी करीत बैस आणि कान्हा आला, कीं धांवत येऊन मला वर्दी दे.

**वारिणी**—आज्ञा बाईसाहेब ! [ जाते.

**यशोदा**—वारिणी म्हणते, कान्ह्यावरून दृष्ट काढायला आपल्या हृदयांच्या कुरवंड्या तयार असतात. पण वेडे, जगांत अशी एक तरी स्त्री दाखीव, कीं जी माझ्या कान्ह्यावरून आपल्या पंचप्राणांची ओंवाळणी करायला प्रतिक्षणीं सिद्ध असत नाहीं ! अवस्थाभेदांप्रमाणं त्यांच्या दृष्टींत काय भेद पडेल तेवढाच ! वृद्ध आणि पोक्त स्त्रिया कान्ह्याकडे पुत्रप्रेमानं पहातात. तारुण्यांत पाय टाकलेल्या किंवा शिरू पहाणाऱ्या कुमारिका कृष्ण आपला हृदयेश्वर व्हावा म्हणून एकमेकींशीं गुप्तपणं स्पर्धा करीत असतात. आणि त्याच्यापेक्षां मोठ्या तरुणी त्याला आपला पाठचा बंधु म्हणून त्याच्यावर प्रेम करतात. पण सर्वजणी माझ्या कान्ह्याकरतां हृदयाची सांडणी करायला एकसारख्याच तयार ! कान्ह्याचं लहानपणापासूनचं अद्‌भुत पराक्रमाचं चरित्र आठवूं लागलं, सर्व जगाला मोहित करणारे त्याचे एकएक गुण मनांत आले, म्हणजे मनाची कशी विलक्षण स्थिति होऊन जाते ! आणि मनाला असं भय वाटूं लागतं, कीं त्रिभुवनाला भूषित क-

रणारं हें कौस्तुभरत्न माझ्या उदरीं आलं खरं, पण तें फार दिवस माझ्या पचनीं पडणं कठीण! देवा, माझं सारं आयुष्य माझ्या कान्ह्याला घाल आणि त्याला मार्कंडेयाप्रमाणं चिरायु कर! मनाला असं वाटतं-कां वाटतं तें कळत नाहीं! पण निःसंशय वाटतं, कीं माझ्या बाळाच्या हातून जगामध्यें कांहीं तरी विलक्षण क्रांति घडून येणार आणि यावच्चंद्रदिवाकरौ कृष्णाचं नांव जगाच्या कल्याणकर्त्या पुरुषांत सर्वांत श्रेष्ठ म्हणून गाजत रहाणार! मनाच्या या खात्रीमुळंच, तिकडच्या मर्जीविरुद्ध कृष्णाला त्याचे उच्च विचार कृतींत उतरावे म्हणून मी उत्तेजन देतें. मातेच्या हृदयाला परमेश्वरानं सहस्रनेत्र करून ठेवलं असल्यामुळं, मुलाचं दूरचं भविष्य तिला अचूक दिसतं. माझा कृष्ण जगदुद्धारक लोकोत्तर महात्मा आहे, हें माझ्या हृदयाला अगदीं अगदीं पटलं आहे. तें कोणाला सांगतांही यायचं नाहीं, आणि पटवितांही यायचं नाहीं. माझ्या बाळानं केशीला ठार मारल्यानंतर माझा आशीर्वाद घ्यायला तो कां बरं आला नाहीं? सांपडला वाटतं पुन्हां विचाराच्या भोंवऱ्यांत! केव्हां एकदां कान्हा येईल आणि त्याच्यावरून माझ्या हृदयाचं लिंबलोण उतरून काढीन, असं मला झालं आहे.

[ वारिणी घाईघाईनें प्रवेश करते. ]

**वारिणी**—बाईसाहेब, युवराज आले.

**यशोदा**—आला का? कुठं आहे? कुठं आहे तो?

**वारिणी**—ही येऊन ठेपलीच स्वारी!

[ कृष्ण प्रवेश करतो. ]

**कृष्ण** ( वंदन करून )—आई, तुझ्या दर्शनाच्या आशारज्जूनं माझे पाय ओढले जाऊन मी हा तुझ्याकडे धांवत आलों आहें. आई, तुझा हा हात अमृतानं ओथंबलेला आहे का ग?

[ राग-मुलतानी; ताल-रूपक; चाल-आरी तेरो ये० ]

**हरी तापा सकल स्पर्श कराचा। तव हा अमृताचा॥ध्रु०॥**
**गमतो हेतु एक मातृ-हृदय खरा संसृतीसि अखिला साचा॥ १ ॥**

**यशोदा**—चल लबाडा! माझी अशी कितीही स्तुति केलीस, तरी मी तिला भाळायची नाहीं हो! म्हणे तुझ्या दर्शनाला मी धांवत आलों! हें जर खरं, तर कालपासून तूं होतास तरी कुठं रे?

**कृष्ण**—आई, मी कुंजद्वीपांत होतों. तुझ्या आणि राधेच्या पवित्र मूर्तींना साक्षी ठेवून मीं तिथं आजच प्रतिज्ञा केली, कीं प्रसंगीं प्राण देऊनही मी मथुरेची मुक्तता करीन. वाटेल तो आत्मयज्ञ करून, कंसाचं मन मी वळवीन किंवा प्रसंगीं त्याचा बलानं निग्रह करून त्यानं भ्रष्ट केलेल्या सिंहासनावर त्याच्या न्यायनिष्ठ पित्याची—उग्रसेनमहाराजांची—पुनःप्रतिष्ठा करून मथुरेच्या राजलक्ष्मीचं कलंकित मुख मी उज्ज्वल करीन! मथुरेच्या सिंहासनाचा एकनिष्ठ प्रजाजन या नात्यानं हा अधिकार मला आहे, असा माझ्या मनानं आज निर्णय दिला.

**यशोदा**—कान्ह्या, ये ये, तुला हृदयाशीं घट्ट धरून मला तुझं मस्तक हुंगू दे! अहाहा! माझा कान्हा खास ईश्वरी अवतार आहे हो! त्याच्यावरून त्रिभुवन ओंवाळून—अगबाई—कान्ह्या—

**कृष्ण**—आई, अशी भांबावल्याप्रमाणं माझ्याकडे कां पहातेस?

**यशोदा**—कान्ह्या, खास तुझ्यामध्यें ईश्वरी अंश आहेरे!

**कृष्ण**—आई, कोणत्या मातेला आपल्या पुत्रामध्यें ईश्वरी अंश दिसत नाहीं?

**यशोदा**—कान्ह्या, केशीचा वध करून विजयी होऊन आलेल्या या माझ्या चिमुकल्या वीराची दृष्ट काढायची सारी तयारी करून तुझी वाट पहात बसलेली मी! पण तूं आल्यावर देखील ते भान मला राहिलं नाहीं! कान्ह्या, काय तुझी जबरदस्त जादुगारी ही!

**कृष्ण**—आई, तुझं प्रेम जबाबदार आहे बरं या जादुगारीला! माझा कांहीं अपराध नाहीं हो यांत!

**यशोदा**—आतां तरी झटकन् तुझी दृष्ट काढूं दे मला. नाहीं तर तुझ्या शब्दसंगीताच्या गोड मोहिनींत माझी आठवण पार विसरून जाईल! वारिणि, आण बाई सारं साहित्य! मेले, तुला देखिल कशी आठवण राहिली नाहीं? (वारिणी पंचारतीचें साहित्य आणते; यशोदा दृष्ट काढूं लागते.)

**कृष्ण**—आई, तुझ्या सुधामय प्रेमदृष्टीचा वर्षाव माझ्यावर नेहमीं होत असतां, मला कुणाचं दृष्टिविष बाधणार आहे? आपला वरदहस्त माझ्या मस्तकीं ठेव आणि माझ्या हातून कंसाचं शासन होऊन, जगन्मंगलाचा प्रारंभ होऊं दे, असा आशीर्वाद मला दे.

**यशोदा**—माझ्या कृष्णाच्या हातून कंसाचं शासन होऊन—

[ त्वरेनें नंद प्रवेश करतो. ]

**नंद**—कंसाचं शासन? 'कोण? कोण कंसमहाराजांचं' शासन करणार? हा कृष्ण? मथुरेच्या गादीचा हा एकनिष्ठ सेवक जिवंत असतां त्याचाच मुलगा, त्याच्या प्रभूचं शासन करणार? आणि या कृत्याबद्दल त्याचीच अर्धांगी आपल्या मुलाचं अभिनंदन करणार? यशोदे, फेंकून दे ती पंचारति! कशाबद्दल तूं आपल्या मुलाचं अभिनंदन करतेस? केशीसारख्या राजवल्लभाला ठार करून महाराजांच्या कोपाची आग अधिक भडकविल्याबद्दल? यशोदे, या राजकोपाचा परिणाम किती दारुण होईल, याची तुला कल्पना असती, तर आपल्या या दिवट्या मुलाभोंवतीं दिवे ओंवाळायला तूं तयार झाली नसतीस! कंसमहाराजांचा क्रोध अत्यंत भयंकर आहे. सारं गोकुळ जाळूनपोळून बेचिराख करण्याचं सामर्थ्य त्यांच्या एका कोपकटाक्षांत आहे! आपल्या राजाचं शासन——

**कृष्ण**—कोण कुणाचा राजा? आपल्या देवासारख्या सरलहृदय पित्याला, मथुरेच्या राजलक्ष्मीच्या खऱ्या वैकुंठेश्वराला-उग्रसेनमहाराजांना केवळ पशुबलानं आणि कपटानं सिंहासनावरून ओढून काढून, म्हातारपणीं तुरुंगांत डांबण्याचं बेशरम कृत्य करणारा हा नरपशु राजा? बाबा, याला कुणीं मथुरेचा राजा म्हटलं, कीं माझ्या तळव्याची आग मस्तकाला जाते! बाबा, तुमच्यासारख्या निःसीम राजनिष्ठाची नजर चुकवून हें घाणेरडं घुंगुरटं चुकून एकदां मथुरेच्या गादीवर जाऊन बसलं, म्हणून तें उग्रसेनमहाराजांच्या राजा या हक्काच्या पदवीला पात्र कसं होणार? बाबा, एकदां चुकून नजरचूक झाली, ती न सुधारतां तशीच चालू ठेवणं, हें आपल्या सुज्ञ राजनिष्ठ बुद्धीला रुचतं तरी कसं?

**नंद**—कृष्णा, कंसमहाराजांनीं मथुरेचं राजसिंहासन अन्यायानं मिळविलं आहे, ही गोष्ट कुणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं. पण ते आज वर्षच्या वर्षं मथुरेच्या सिंहासनावर विराजमान होत आहेत ना? कालाचं सामर्थ्य अचाट आहे. कंसमहाराज मथुरेच्या सिंहासनाला योग्य नसते, तर कालपुरुषानं उंसाच्या चोयटीप्रमाणं त्यांची केव्हांच वाऱ्यावर वरात काढली असती! काल हा तरी न्यायी परमेश्वराच्या दरबारांतला एक अधिकारी आहे ना?

[ राग–बहार; ताल–एकताल; चाल–सुनत बन मुरलीकी० ]

**जगतिं मत काला तें हित मानिती ॥ ध्रु० ॥ चपल चतुर अति तो गुणसंवरणीं। त्या विबुध असे वानिती ॥ १ ॥ परम गुणनिचय हा बघतां त्याचा। करि सुरगण नति त्याप्रति ॥२॥**

**कृष्ण**—वा ! हा न्याय फार चांगला आहे ! गोष्ट किती कां वाईट असेना, ती कालाच्या प्रवाहांत टिकून राहिली म्हणजे तिच्या ठिकाणीं चांगुलपणा आपो-आप येतो म्हणायचा ! बाबा, स्वर्गाइतकंच नरकाचं गतायुष्य आहे; म्हणून त्या दोघांची बरोबरी कशी होईल ?

**नंद**—कृष्णा, न्यायान्यायाचे पाठ मला तुझ्यासारख्या कच्च्या पोराकडून शि-कायचे नाहींत ! तुला मी आज शेवटचं स्पष्ट सांगतों, कीं कंसमहाराजांविरुद्ध तूं जी ही बंडाळी आरंभिली आहेस, ती आतां विलक्षण थराला जात चालली आहे. ती मी यापुढं बिलकूल चालूं देणार नाहीं.

**कृष्ण**—बंडाळी कोण करतो ? बाबा, मी बंडखोर नाहीं; तर कंसानंच आप-ल्या राजाविरुद्ध बंडाळी चालविली आहे ! ज्याला हृदय आहे-हृदयांत परमेश्वर आहे, तो या बंडाळीचा प्रतिकार करणारच !

**नंद**—काय ? तुझ्या स्वैर वर्तनाची मजल इथपर्यंत येऊन पोंचली ? या क्ष-णींच तुझा योग्य बंदोबस्त मला केला पाहिजे.

**कृष्ण**—बाबा, मथुरेची मुक्तता करण्यासाठीं वाटेल तो आत्मयज्ञ मी करणार ! माझ्या या परमपूज्य मातृदेवीच्या चरणांना साक्ष ठेवून मी आजच प्रतिज्ञा केली आहे, कीं कंसाचं मन वळवून, किंवा बलानं त्याचा निग्रह करून मी जगाच्या दुः-खाचा भार हलका करीन. बाबा, आपल्याही पूज्य चरणांना साक्षी ठेवून मी पुनः त्याच प्रतिज्ञेचा उच्चार करतों, कीं कंसाचं मन वळवून किंवा त्याचा निग्रह करू-न मी जगाचा दुःखभार हलका करीन. ही प्रतिज्ञा जर माझ्या हातून पार पडली नाहीं, तर मी अक्षय नरकवास भोगीन !

**नंद**—नाहीं, कंसमहाराजांना लवमात्र दुखविण्याची मोकळीक तुला नाहीं. माझ्या प्रभूच्या निग्रहाचं पाप माझ्या मुलाच्या हातून होतां कामां नये. कृष्णा, तुझं भडकलेलं मस्तक ताळ्यावर येऊन तूं आपली प्रतिज्ञा मागं घेतल्याचं जाहीर करीपर्यंत तुला नजरकैदेंत राहिलं पाहिजे. कंसमहाराजांच्या नांवानं मी तुला कैद करतों. कोण आहेरे तिकडे ?

**यशोदा**—काय भलताच अविचार हा ? पोटच्या पोराला का बंदींत टाका-यचं ? तिकडे कंसानं बापाला अन्यायानं बंदींत टाकलं, तर इकडे आपण त्याची कड घेऊन स्वतःच्या मुलाला बंदींत टाकणार ! मी नाहीं असा अविचार आपल्या हातून होऊं द्यायची !

**नंद**—कृष्णानं प्रतिज्ञेचा त्याग तरी केला पाहिजे, नाहीं तर जन्माचा बंदिवास तरी पत्करला पाहिजे.

**कृष्ण**—बाबा, आपलेच चरण साक्ष आहेत, कीं आजपर्यंत पुत्रधर्माचा भंग माझ्या हातून चुकूनही घडला नाहीं. घडला असेल, तर याच क्षणीं परमेश्वराचं वज्र माझ्या मस्तकावर आदळून माझा देह भस्म होवो! परंतु आपली ही अन्यायाची आज्ञा-राजाविरुद्ध, धर्माविरुद्ध, ईश्वराविरुद्ध, आपली ही आज्ञा-न पाळण्यानं माझ्या हातून पुत्रधर्मभंगाचं पातक घडेल, असं माझं मन मला साक्ष देत नाहीं. पितृमातृधर्माविरुद्ध राजधर्म, देवधर्म आणि राष्ट्रधर्म यांचा विरोध आला, तर पितृमातृधर्माचा भंग करून या तीन श्रेष्ठ धर्मांचंच मनुष्यानं पालन केलं पाहिजे.

**नंद**—नाहीं-पोटच्या पोराला बंदींत टाकण्याचं दुर्भाग्य मला टळत नाहीं!

**कृष्ण—बाबा**, माझ्या प्रतिज्ञापालनांत माझ्या प्राणांची शर्त मीं अगोदरच लावली आहे. बंदिवासाचं भय मला तिळमात्रही वाटत नाहीं. बाबा, जगांतील एकाही बंदिशालेचे दरवाजे या कृष्णाला अटकाव करूं शकणार नाहींत.

[ राग-मारवा; ताल-त्रिताल; चाल-उदेतन देरेना० ]

**मज नच जगतिं लवहि निरोध । निजभरण-पुण्यशरणास। अघाला जयाच्या हृदयिं कधि अणु न पद ॥ ध्रु० ॥ बघोनी जना या भग्न शिला । विशाल कराल त्यजुनी मद ॥ १ ॥**

**नंद**—कृष्णा, तुझं आजचं हें विलक्षण वर्तन पाहून तूं माझाच कृष्ण काय, अशी मला शंका येते.

[ राधा प्रवेश करते. ]

**राधा**—महाराज, आपली शंका बरोबर आहे. कृष्ण आपला पुत्र नाहीं. त्याला बंदींत टाकण्याचा आपणाला अधिकारच नाहीं.

**नंद**—राधे, काय म्हणतेस? कृष्ण माझा पुत्र नाहीं?

**यशोदा**—राधे, काय म्हणतेस तूं हें? कान्हा माझा-अगदीं माझा आहे!

**कृष्ण**—राधामाई, तुझ्या मनांत आहे तरी काय?

**राधा**—मी म्हणतें तेंच खरं आहे. श्रीकृष्ण हा उभयतां सरकारांचा पुत्र नाहीं. आपले परममित्र वसुदेव आणि त्यांची पत्नी देवकी यांचा श्रीकृष्ण हा आठवा मुलगा. याच्याच हातून कंसवध होईल, असं भविष्य नारदमुनींनीं कं-

सांगितलं असल्यामुळं त्या राक्षसानं त्या जोडप्याचीं सर्व मुलं क्रूरपणानं ठार मारलीं. श्रीकृष्णाच्या जन्माच्या वेळीं वसुदेवानं पुत्रवात्सल्यानं प्रचंड धाडस करून, सर्वांची नजर चुकवून, याला गोकुळांत सरकारच्या वाड्यांत आणलं. आईसाहेब, आपण त्या वेळीं प्रसूतीच्या बेशुद्धींत असून माझ्या सासूबाई आपल्या धात्री म्हणून जवळ होत्या. वसुदेवांनीं त्यांचं मन वळवून श्रीकृष्णाला आपल्या-पाशीं ठेवलं आणि आपली मुलगी मथुरेला नेली. ती कंसाच्या दुष्टाव्याला बळी पडली.

**नंद**—देवा, काय ऐकतों मी हें ? कृष्ण माझा नाहीं–या दुर्दैव्याचा नाहीं ! राधे, तुला हें कसं कळलं ? तूं तर सत्यवचनी आहेस.

**राधा**—महाराज, काल कंसाच्या दरबारांत विलक्षण रीतीनं हा कृष्णजन्माच्या गौप्याचा स्फोट एकाएकीं झाला. वसुदेवांनींही हें सत्य असल्याबद्दल कबुली दिली-त्यामुळं भडकून जाऊन, त्यांची अत्यंत निर्भर्त्सना करून कंसानं त्यांना आणि देवी देवकीला पुनरपि बंदींत टाकलं.

**कृष्ण**—चांडाळा दुर्दैवा ! केवढा प्रचंड आघात केलास हा !

**यशोदा**—कान्हा माझा नाहीं–माझा बाळ माझा नाहीं !

**राधा**—महाराज, वसुदेव-देवकींना बंदींत टाकल्यामुळं सर्व दरबार एकदम क्षुब्ध होऊन गेला. अंधक म्हणून जे यादवादि क्षत्रियांचे पुढारी आहेत, त्यांनीं कंसाच्या या अन्यायी कृत्याबद्दल भरसभेंत त्याची खूब कानउघाडणी केली; परंतु तिचा त्या पाषाणहृदयावर एवढाच परिणाम झाला, कीं त्यानं अंधकालाच बंदि-खान्यांत टाकलं. महाराज, आईसाहेब, सर्वांत दुःखाची गोष्ट ही, कीं या सर्व अ-नर्थाला कारण ही हतभागी राधा !

**यशोदा**—काय झालं ? राधे, सर्व नीट सांग.

**राधा**—माझ्या आणि श्रीकृष्णाच्या निर्मल स्नेहासंबंधीं आतिशय विपरीत कल्पना करून, नाथांची स्वारी आपणां सर्वांविरुद्ध फिर्याद करायला काल कंसा-कडे गेली असतां, त्वेषाच्या भरांत स्वारीकडून हें कृष्णाचं जन्मरहस्य भरदरबा-रांत फुटलं. तिकडे तरी सासूबाईंनीं हें नुकतंच सांगितलेलं दिसतं. कृष्ण हा आप-ल्या प्राणघातक वैरी आहे, हें कळन येतांच ‘ सारं गोकुळ जाळनपोळून उध्वस्त करून टाकीन, समूळ यादवांचा निःपात करून आठ दिवसांच्या आंत कृष्णवध करीन, ’ अशी काल त्या राक्षसानं घोर प्रतिज्ञा केली आहे. हा सर्व वृत्तांत स्वारी

सासूबाईंना सांगत असतां मीं नुकताच ऐकिला.

**कृष्ण**—माझा वध करण्याची त्या मशकानं प्रतिज्ञा केली आहे? राधामाई, हें ऐकून मला अतिशय आनंद झाला ! बाबा, माझी प्रतिज्ञा पार पाडण्याचा हा दैवी संदेशच मला झाला आहे !

**यशोदा**—महाराज, आपली निर्दोष, निष्पाप, सुकुमार कन्या ज्यानं क्रूरतेनं ठार केली, त्यानंच गोकुळ जाळण्याची, यादवांची समूळ राखरांगोळी करण्याची आणि आपल्या या प्राणप्रिय पुत्राच्या वधाचीही प्रतिज्ञा केली आहे. अजून त्या तोतया कंसाबद्दलची आपली निष्ठा कायमच आहे ना ?

**नंद**—यशोदे, स्वामिनिष्ठेचे डोळे नेहमीं वर असतात; ते कधींही नीचपणानं खालीं पहात नाहींत.

**कृष्ण**—बाबा, आपल्या या लाडक्या कृष्णाला कंसाचा निग्रह करून उग्रसेनमहाराजांची सिंहासनावर पुनः स्थापना करण्याची अनुमति द्या.आपल्या आशीर्वादाचं बळ असल्याशिवाय मला कुठल्याहि कार्यांत परमेश्वर यश देणार नाहीं.

[ राग-सिंदुरा; ताल-झपताल; चाल-ये पिहरवा मोरि० ]

**या तिमिरकान्तारिं रवि या पदां पाहिं । अमरांहि यांनिकटिं केव्हां न गणिलें ॥ ध्रु० ॥ वात्सल्यलीला कैशा निमाल्या । करुणार्द्र हें हृदय कां हो खर बलें ! ॥ १ ॥**

**नंद**—बाळा, तुझ्या जन्माच्या रहस्याचा स्फोट झाल्यानंतरही तूं मला पितृपदीं मानून प्रेमानं मला ‘ बाबा ’ या पूर्वीच्याच नांवानं हांक मारतोस, हें तुझ्या थोर हृदयाचं द्योतक आहे. बाळा, तुझ्यासारख्या त्रिभुवनाला अलंकारस्वरूप नररत्नाचा पिता होण्याचं भाग्य माझ्यासारख्या अभागी क्षुद्र पुरुषाला कुठून असणार, ही शंका मला यापूर्वीच यायला पाहिजे होती; परंतु तुझ्या जबरदस्त मायामोहिनीनं मी पुरा मोहून गेलों होतों. कृष्णा, अमुक कर आणि अमुक करूं नको, असं तुला म्हणायला मला आतां काय अधिकार राहिला आहे ?

[ राग-काफी कानडा; ताल-त्रिताल; चाल-सुखकर आई० ]

**वधि कुल सारें । विधि विकारें ॥ ध्रु० ॥ तूं कुलभानु अस्ता अजि जातां । तिमिर महा, सुटती भयकर वारे ! ॥ १ ॥**

**यशोदा**—बाळा, तूं आतां आमचा नाहींस रे !

**कृष्ण**—बाबा, आई, आपल्या या करुण उद्गारांनीं माझं हृदय पार चिरून

टाकलं ! मला जन्म देणारे आईबाप निराळे असले, तरी मातापिता या परम उच्च नात्यांनीं, निःसीम वत्सलतेच्या प्रेमानं, माझ्या साऱ्या खस्ता आपणच खाल्ल्या. माझ्यासाठीं भयंकर कष्ट सहन करून मला लहानाचा मोठा आपणच केलात. माझ्या ऐहलौकिक, पारलौकिक कल्याणाच्या उच्च ध्येयाकडे सूक्ष्म नजर ठेवून, मला सर्व तऱ्हेचं उत्कृष्ट शिक्षण आपणच दिलंत. हे सर्व कष्ट, परिश्रम, मनोयातना सहन करीत असतां, आपणाला स्वार्थाचा कधीं लवलेशही शिवला नाहीं. दुर्दैवानं आपण माझी जन्मदातीं मातापितरं नाहीं असं ठरलं, म्हणून आपल्या अपूर्व स्वार्थत्यागाच्या मोबदल्यांत, आपण मला पुत्र म्हणून विकत घेतलं, तो आपला अधिकार नाहींसा कसा होईल ? बाबा, आई, आपणाला या प्रिय नांवांनीं हांका मारण्याचा अधिकार मला जन्मपर्यंत असूं द्या. निष्ठुर हृदयानं मला आपणापासून दूर लोटूं नका.

**राधा**—श्रीकृष्णा, महाराज आणि आईसाहेब इतक्या निष्ठुर हृदयाचे खास नाहींत. परंतु तुला याच मायामोहांत गुंतून रहातां यायचं नाहीं. कंसाचा निग्रह करून आपल्या जन्मदात्यांना आणि यादवादि वीरांचा पक्ष घेऊन कंसाच्या रोषाला पात्र झालेल्या वीरश्रेष्ठ अंधकांना दुष्ट कंसाच्या बंदिवासांतून सोडविण्याचा भार तुझ्या मस्तकावर नवीनच पडला आहे. तो तुला स्वतःला पार पाडला पाहिजे. ‘ श्रीकृष्णा, आमची मुक्तता कर, आमचं रक्षण कर, ’ असं आतां तुझा राजा, आई, बाप, देश आणि धर्म करुणवाणीनं तुला विनवीत आहेत.

**कृष्ण**—बाबा, आपल्या अनुमतीची भिक्षा मला घाला आणि आपल्या मंगल आशीवार्दाचं अभेद्य कवच माझ्या अंगांत चढवा.

**यशोदा**—महाराज, याचना करणाराची योग्यता आणि हेतु यांचा उच्चपणा ध्यानांत घेऊन त्याला नकार देऊं नका.

**नंद**—काय करूं ? कोणत्या मार्गानं या विलक्षण संकटांतून आपली मुक्तता करून घेऊं ? बाळा, तुझे आईबाप कंसमहाराजांच्या पीडनाच्या दारुण यातनांतून मुक्त होण्याच्या आशेनं आतां तुझ्या वाटेकडे डोळे लावून मूकरूदन करीत असतील. त्याच यातनांत त्यांना जन्मभर पचूं दे, असं मी कसं म्हणूं, किंवा धडधडीत कंसमहाराजांचं शासन करण्याची अनुमति तरी तुला कशी देऊं ? कृष्णा, तूं सुज्ञ आहेस; कर्तव्याकर्तव्याचा ज्ञाता आहेस. योग्य दिसेल त्या मार्गाचं अवलंबन कर, यापेक्षां मी तुला अधिक काय सांगूं ? यापेक्षां अधिक स्पष्ट शद्बोच्चार

मला पातकाच्या भयंकर दलदलींत घट्ट रुतून बसवील.

**राधा**—श्रीकृष्णा, सुज्ञांच्या मुकेपणांतच त्यांच्या स्पष्ट शब्दापेक्षां अधिक अर्थ असतो.

**कृष्ण**—बाबा, आई, आपले अमृतकर माझ्या मस्तकीं ठेवून मला आशीर्वाद द्या, म्हणजे मला कालिकालाचेंही भय नाहीं.

**नंद-यशोदा**—तुझा सर्वदा विजय असो!

[ राधेशिवाय सर्व जातात.

**राधा**—श्रीकृष्णानें शेवटीं प्रतिज्ञा केलीच! जगाच्या भाग्योदयाचा हा रम्य उषःकाल पुढील दिवसाचें सुंदर भविष्य ध्वनित करीत आहे, यांत शंका नाहीं.

[ राग-देसकार; ताल-त्रिताल; चाल-झांझलिया झनके० ]

**पाप लया गेलें। पुण्य लाक सारा। वाहि शांतिधारा। त-**
**मातें न थारा॥ ध्रु०॥ अघनाश होतां हा घे समता दिवींची**
**रुचिर धरा॥ १॥**

[ पडदा पडतो. ]





कृष्ण—आपले अमृतकर माझ्या मस्तकीं ठेवून मला आशीर्वाद द्या— ( पृष्ठ ४२.

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ अक्रूराच्या वाड्यांतील एक दालन. अक्रूर आणि अंधक बोलत आहेत. ]

**अंधक**—अक्रूरजी, माझ्या अभिनंदनाची ही वेळ नव्हे, आणि या प्रसंगीं तें योग्यही होणार नाहीं. कंसानं केलेली माझी सुटका, लवकरच घडून येणाऱ्या घोर अनर्थाचं पूर्वचिन्ह आहे, हें तुम्ही पक्कं समजा. या दुष्टानं—आपल्या बापाची गादी अन्यायानं बळकावलेल्या या दुष्ट पिशाचानं—आतांपर्यंत असं कोणतं सत्कृत्य केलं आहे, तर त्याच्या जोडीला हें बसवितां येईल ? आपल्या बळीला ठार मारण्यापूर्वी आस्वल त्याला घट्ट आलिंगन देतं, त्यांतलीच ही कंसाची कृति तुम्ही समजा ! मला बंधमुक्त करण्यांत त्याचा कांहीं तरी कुटिल हेतु आहे.

**अक्रूर**—कंसाच्या हातून आजपर्यंत चुकून एकहि सत्कृत्य घडलं नाहीं, हें त्याच्या कट्या पक्षपाती स्नेह्यालाही कबूल केलंच पाहिजे. परंतु किती झालं तरी तो मनुष्यच आहे ना ? माणसाला एखादे वेळीं तरी सद्बुद्धि होणार नाहीं का ?

**अंधक**—कंसाची तुम्ही माणसांमध्यें गणना करीत असल्यामुळं तुमचा हा सिद्धांतच मुळीं चुकीचा आहे ! कंस हा राक्षस आहे, पिशाच आहे, सर्प आहे ! कंसाला कधीं सद्बुद्धि झाली, तर यमधर्माची विश्रांत मुळीं जरूरच उरणार नाहीं !

**अक्रूर**—आपण ही जरा अतिशयोक्ति करीत आहां. मी आपणाला खरोखर सांगतों, आपल्या परवांच्या निःस्पृह कानउघाडणीचा कंसमहाराजांच्या मनावर अतिशय परिणाम झाला असून, आजपर्यंतच्या आपल्या दुष्ट कृत्यांबद्दल त्यांना फार पश्चात्ताप झाला आहे. विशेषतः श्रीकृष्णाशीं आतांपर्यंत व्यर्थ वैर करून शत्रुत्व संपादन केल्याबद्दल त्यांचं मन त्यांना अतिशय खाऊं लागलं आहे. आजपर्यंत केलेल्या अपराधांबद्दल श्रीकृष्णाची अंतःकरणपूर्वक क्षमा मागून त्याच्याशीं स्नेहभाव जोडण्याचा महाराजांनीं निश्चय केला असून, तत्प्रीत्यर्थ, या महोत्सवाच्या निमित्तानं श्रीकृष्णाला मथुरेंत आणायला त्यांनीं माझीच योजना केली आहे. त्या कार्यासाठीं राजप्रतिनिधि म्हणून उद्यां मी गोकुळाला जात आहें.

**अंधक**—अक्रूरजी, आपल्या भोळ्या स्वभावाची मला कीव येते ! जें पराक्रमाच्या किंवा बळाच्या बळावर साधत नाहीं, तें कपटानं साधून, आपल्या या अवतारी शत्रूचा निःपात करण्याच्या हेतूनं कंस तुम्हाला गोकुळाला पाठवीत आहे. अक्रूरजी, मला सांगा, श्रीकृष्णाच्या आईबापांना तुरुंगांत डांबून त्यांचे हालकरणं हें या कपटी कंसाच्या पश्चात्तापाचं लक्षण तुम्ही समजतां काय ? श्रीकृष्णाशीं सख्य जोडायचा खरोखरीच त्याचा हेतु असता, तर त्यानं ताबडतोब वसुदेव-देवकींना बंधमुक्त करून, त्यांचे पाय धरून त्यांची क्षमा मागितली असती. मी तर म्हणतों, कीं कंस महामूर्ख आहे ! आपला डाव साधण्याचीही त्याला अक्कल नाहीं.

**अक्रूर**—हो, आपण म्हणतां तसं दिसतं खरं. कंसाचं मन कृष्णाविषयीं शुद्ध झालेलं नाहीं.

**अंधक**—अक्रूरजी, माझ्या वृद्ध अनुभवी वचनावर विश्वास ठेवा. श्रीकृष्णाला मथुरेला आणून या नाहीं त्या कपटयुक्तीनं त्याचा वध करण्याचा कंसाचा गुप्त हेतु आहे. याचसंबंधानं मी तुमच्या भेटीला आलों आहे. कंसाच्या उत्पाती अनर्थांनीं त्राहि भगवान् झालेल्या यादव, भौम, कुकुर, अंधक, वृष्णि, वगैरे क्षत्रियांनीं उग्रसेनमहाराजांची त्यांच्या हक्काच्या सिंहासनावर पुनः स्थापना करण्याचा निश्चय केला असून, कंसाचा निग्रह करून सर्व सज्जन दुनियेची मुक्तता करण्याविषयीं श्रीकृष्णाला विनंति करावी, असं आम्हीं सर्वांनीं ठरविलं आहे. इतक्यांत तुम्ही राजाज्ञेनं श्रीकृष्णाची भेट घ्यायला निघालां आहां, अशी आम्हांला बातमी कळली, आणि म्हणूनच मी हा तुमच्याकडे आलों आहें. अक्रूरजी, कंसाच्या तापानं त्रस्त झालेल्या दीन दुनियेची तुम्हाला एवढीच विनंति आहे, कीं तुम्ही श्रीकृष्णाच्या कानांवर सारी खरी खरी हकीगत घाला, आणि 'दुष्ट, कपटी कंस, कपटानं तुझा वध करूं पहातो आहे; तेव्हां सदासर्वदा सावध रहा,' अशी त्याला तुम्ही कळवळ्याची सूचना द्या. 'तुझ्या पराक्रमानं उग्रसेनमहाराजांचं रामराज्य परत मिळेल, अशी सर्व मथुरेची अपेक्षा असून, तुला कुणीच कसलीही हरकत करणार नाहीं,' असा आमचा नम्र संदेश तुम्ही श्रीकृष्णाला जरूर सांगा. अक्रूरजी, तुमचे हे श्रम आम्ही व्यर्थ जाऊं देणार नाहीं. आमच्यापैकीं बाहुकांचं परमगुणसंपन्न 'सुगात्री' नामक कन्यारत्न तुमच्या या कामगिरीबद्दल तुम्हाला अर्पण करावं, असा आमचा हेतु आहे.

**अक्रूर**—अंधकमहाराज, या अमूल्य बक्षिसाच्या लोभानं नाहीं, पण परमेश्वरी दयेच्या नांवानं मी आपणां सर्व सज्जनांची ही आज्ञा शिरसा मान्य करतों. आपला निरोप मी श्रीकृष्णाला अवश्य कळवीन.

**अंधक**—प्रभु तुमचं कल्याण करो ! अक्रूरजी, सज्जनांच्या संतुष्ट आशीर्वादांत त्रिभुवनांतील मंगलाची सीमा संपते, हें ध्यानांत ठेवा. [ जातात.

---

## प्रवेश दुसरा

[ राधेचा महाल. अनय सचिंत उभा आहे. ]

**अनय**—अरेरे, केवढा हतभागी चांडाळ मी! माझ्या मनःक्षोभाची लहर पूर्ण करून घेण्यासाठीं, मी माझ्या कुलाचा, प्रिय आप्तेष्टांचा, पूज्य राजाचा आणि परमेश्वरतुल्य देशाचा कायमचा घात करायला सिद्ध झालों अं ! काय माझी स्थिति झाली ही !

[ राग—बागेश्री; ताल—एकताल; चाल—अब मेरि छांड० ]

**तिळभरि शांति नच हृदयिं । भ्रान्तिगुणें जगिं सुख मम जीव**
**विसरला ॥ ध्रु० ॥ निजजन्मभूशीं जो द्रोहकारी । त्या सुख**
**शम न कधिंहि नीच जंतुला ॥ १ ॥**

*पण नको, तो विचारच नको. आतां पूर्णाहुति पडेपर्यंत कसला विचार नको आणि कांहीं नको !* [ राधा प्रवेश करते. ] राधे, तुला मीं दिलेल्या मुदतीचा अवकाश संपून गेला. सांग, तुझा विचार काय ठरला? त्या कपटी काळ्याच्या मोहाचा त्याग करून, गोकुळ सोडून कुठेंहि जायला तूं तयार आहेस, किंवा मथुरेंत कंसाच्या बंदींत जन्मभर खितपत पडायची तुझी तयारी आहे? तुला मथुरेंत घेऊन यायचा कंसमहाराजांचा मला सक्त हुकूम आहे.

**राधा**—महाराज, अशा जुलमाच्या आडविहिरींत मी आपल्या हातचा मृत्यु पसंत करीन ! महाराज, माझा अंत कां उगीच पहातां ? मी आपणाला प्रतिक्षणीं आर्जवून सांगत आलें, कीं श्रीकृष्ण आणि मी दोघंही निष्पाप आहों; आमचीं हृदयं परस्परांबद्दल अगदीं शुद्ध आहेत. परंतु आपल्या मनांतली ही दुष्ट कसकस नाहींशी कशी होत नाहीं ? महाराज, श्रीकृष्णाचं मन इतकं निर्मल आहे, कीं त्याच्या पुण्यसंगतींत पाप्यांतली पापी व्यक्ति देखील देवरूप बनून जाईल !

महाराज, आपल्या पतिदेवाला आपल्या पातिव्रत्याविषयीं संशय येणं यापरतं आर्यस्त्रीच्या कपाळीं दुर्भाग्य कोणतंही नाहीं; पण श्रीकृष्णाच्या निष्पाप सहवासाचा त्याग करणं हें मी त्यापेक्षांहि दुर्भाग्य समजतें.

**अनय**—बेशरम चांडाळीण! त्या कपट्याच्या सहवासाच्या माधुर्याचं वर्णन जिभल्या चाटीत माझ्या–प्रत्यक्ष आपल्या लग्नाच्या नवऱ्याच्या–तोंडावर करण्यापर्यंत तुझी मजल आली अं? त्या अधमाच्या स्तुतीचे शब्द ज्या जिव्हेनं उच्चारले जातात, ती जिव्हाच मुळासकट उपटून काढून, जगांत उजेड पाडणारी तुझी प्राणज्योतिच विझवून टाकावी, असं मला होऊन जातं! राधे, राधे, कोणत्या दुष्ट मोहिनीचा मोह तुझ्यावर पडून तुझी सारी स्मृतिच अशी नष्ट झाली? परस्परांच्या मधुर सहवासांत उभ्याठाव ब्रह्मांडाची विस्मृति पडून, त्या ब्रह्मानंदांत आपण स्वतःचे स्वतःलाही विसरत असूं! त्या सुखमय कालाची एक क्षण तरी आठवण कर आणि मला सांग, या अनयाचं हृदय पूर्णपणं राधामय झालं नव्हतं काय?

[ राग–दरबारी कानडा; ताल–त्रिताल; चाल–जानकिराम राजाकी० ]

**मानसा या देहा। तूंचि स्वामिनी भुवनिं एका ॥ध्रु०॥ जया तव करिं दिलें तें। हृदयचि चिरिसी हातें। ही कृति नेइल नारका ॥ १ ॥**

राधे, राधे! त्या काळ्या काळभैरवाच्या अशा कोणत्या सद्गुणावर तूं मोहून गेलीस, कीं त्या मोहाच्या मोबदल्यांत तूं आपल्या पातिव्रत्याचा—

**राधा**—महाराज, हें मी ऐकून घेणार नाहीं! जगांतल्या पतिव्रतांच्या निंदेनं प्रत्यक्ष परमेश्वरही उभा जळून खाक होईल! महाराज, श्रीकृष्ण निर्मल आणि मी पूर्ण निष्पाप आहें, असं जिवाचं रान करून आपणाला प्रतिक्षणीं मी सांगत असतां, तें निव्वळ अरण्यांत रडल्याप्रमाणं होतं, त्याला मी तरी काय करूं? नाथ, आपण ज्ञाते आहां; मुद्दाम असं आडरानांत कां शिरतां?

**अनय**—राधे, तूं मनानंही भ्रष्ट नाहींस, तर मग कृष्णाच्या स्नेहाविषयीं तुझा एवढा अट्टहास कां?

**राधा**—महाराज, त्याचं कारण आपणाला कितीही सांगितलं, तरी तें आजवर पटलं नाहीं; आणि पुढंही पटणार नाहीं—

**अनय**—राधे, असल्या भुलथापांनीं एखादं लहान पोरही फसणार नाहीं! कृष्ण म्हणे देवांश! आणि त्याच्या हातून जगाचा उद्धार होणार! हा काळ्या

आपल्या कुळाचा उद्धार करतो आहे, तेवढा पुरे नाहीं का झाला ?

**राधा**—महाराज, त्या महात्म्याच्या निंदेनं पापाची व्यर्थ जोड करून कां ठेवतां ? आपल्याला मी शेवटचं निक्षून सांगतें, कीं आपल्याशिवाय सर्व पुरुष मला बंधुसमान आहेत, आणि श्रीकृष्ण पूर्ण निष्कलंक आहे. माझे कुणीं राईराई-एवढे तुकडे केले तरी श्रीकृष्णाला सोडून मी कुठंही जायची नाहीं. श्रीकृष्ण तिथं राधा ! तो मला देवच वाटतो.

**अनय**—अग, तुझे पतिव्रतेचे असे देव तरी किती ? मी एक देव; तो कृष्ण दुसरा देव ! होतां होतां आपल्या पातिव्रत्याच्या जोरावर तेहतीस कोटि देवांची तूं अशीच भरती करणार काय ? कशाला उगीच पातिव्रत्याचं ढोंग करतेस ? पतिदेवापेक्षां पतिव्रतेला दुसरा देव आणि धर्म नाहींना ?

**राधा**—त्यापेक्षांही अधिक श्रेष्ठ धर्म जगांत आहेत. राजधर्म, स्वजनधर्म, आणि राष्ट्रधर्म ! पतिव्रतानांच काय, पण मनुष्यमात्राला हे धर्म सर्व धर्मापेक्षां अधिक वंद्य आहेत.

**अनय**—अस्सं काय ? हा तुझा पापी धर्म, आणि तो काळभैरव तुझा धर्माचार्य ! राधे, तुझ्या या स्वैर धर्माला मी आळा घालणार ! सांग, मला शेवटचं सांग, तुला गोकुळ सोडायचं नाहींना ?

**राधा**—नाहीं, नाथ, नाहीं ! श्रीकृष्णाच्या सहवासाचा त्याग करण्यापेक्षां त्रिभुवनांतल्या साऱ्या यातना सोसायला माझी तयारी आहे !

**अनय**—चांडाळणी, याचं प्रायश्चित्त तुला लवकरच मिळेल. [ जातो.

**राधा**—ही सारी हकीगत श्रीकृष्णाला ताबडतोब कळविली पाहिजे. नाथ, आपणांला कल्पनाही नाहीं, कीं या धर्मपालनापासून जगाचं केवढं कल्याण होणार आहे !

[ राग–जिल्हा पिलू; ताल–रूपक; चाल–मोहन मूरत ये० ]

**मंगल धर्म महा त्रिभुवर। वितरि जनां शुचि हा शुभकर ॥ध्रु०॥ वरितां या नव त्यागसारीं। स्वर्गसुषमा निरयकुहरीं। भरित सुधा वसुधा मधुर ॥ १ ॥**

[ जाते.

---

# प्रवेश तिसरा

[मथुरेच्या राजवाड्यांतील एक दालन. कृष्णाच्या वेषानें चाणूर प्रवेश करतो.]

**चाणूर**—परवां, एका ठेंगणेपणाशिवाय कृष्णाचं सहीसही रूप मला साधलं, अशी माझ्या कट्टया शत्रूची देखील साक्ष पटली. उंचीच्या कमीपणामुळं त्या नीच मुष्टिकाचे मुष्टिमोदक मला खावे लागले, ही गोष्ट निराळी! ती चूक आतां सुधारली पाहिजे. ( पायांच्या पुढच्या चवड्यांवर चालतो. ) ओय् ओय् ओय्! प्रेमाचा मार्ग अतिशय कठीण, हा अनुभव मला पदोपदीं येतो आहे! इथंच मी असा जरा उंचावून बसलों, तरी देखील माझा कार्यभाग सहज होणार आहे.

(तसा बसतो.)

[ कुब्जा हार घेऊन प्रवेश करते ]

**कुब्जा** ( स्वगत )—माझे मनोरथ लवकरच पूर्ण होणार! माझ्या कृष्णचंद्राचा उदय या पातकी मथुरानगरींत होऊन, या नगरीचं सारं पातक धुऊन निघून, मथुरा देवांची देवपुरी बनणार! श्रीकृष्णाला मथुरेला आणायला अक्रूरजी आज निघूनही गेले म्हणतात. श्रीकृष्णा, तुझ्या मुखचंद्राचं अगदीं दुरून दर्शन घेऊन तुझी पूजा करण्याकरितां हा पहा फुलांचा हार देखील मीं तयार करून ठेवला आहे. पण छे ग बाई! माझ्या कृष्णदेवाच्या दर्शनाच्या पुण्याईवर मला स्वर्गींच्या अमृतसागरांत पोहायला मिळावं म्हणून, वैऱ्याच्या राजधानींत त्यानं घेऊन प्राणसंकटांत पडावं, अशी मी इच्छा करतें! कुब्जे, तुझ्या आपलपोटेपणाची शर्थ झाली अगदीं! ( समोर पाहून ) अगबाई! हें कोण? माझी दृष्टि तर चुकत नाहीं? नाहीं. माझा कृष्णचंद्रच हा! देवाचं हृदय थोर, त्याला भक्ताच्या भावना मनोमन कळतात. म्हणूनच, मथुरेंत पाय टाकतांच, माझे नाथ मला दर्शन देण्यासाठीं धांवून आले. पण मी आपलं अमंगल दर्शन कृष्णचंद्राला देऊन त्याच्या चंद्रिकेला काळंकुट्ट ग्रहण लावणार नाहीं.

**चाणूर** ( स्वगत )—काय आणि कसं बोलावं या सटवीशीं? थोडी करावी गंमत! माझीच निंदा सुरू करावी झालं! (उघड) कुब्जे, प्राणेश्वरि, मला तूं ओळखलंस का? अग, मीं तुझा गोकुळचा कृष्ण! तुझ्या प्रेमाच्या ओढीनं, मथुरेंत पाय टाकतांच, मी अगोदर तुझ्या दर्शनाला धांवून आलों.

**कुब्जा**( स्वगत )— आतां करूं तरी काय बाई! नाथांनीं एकदम बोलाय-

लाच सुरवात केली ! माझ्या हातांपायांना कांपरं सुटून जिभेला कशी कोरड पडली अगदीं !

**चाणूर**—प्रिये, तूं अशी स्तब्ध कां ? मी इतक्या आतुरतेनं तुझ्या भेटीला धांवत आलों, आणि तूं असं मौन धरून बसतेस ? माझ्यावरील तुझ्या प्रेमाविषयीं तुझ्या दूतानं तर फारच तारीफ केली.

**कुब्जा** ( स्वगत )—आतां करावाच थोडा धीर !(उघड ) माझा दूत ! कोण बाई माझा दूत ?

**चाणूर**—तो लठ्ठेश्वर चाणूर ! कंसाचा उजवा हात ! अकलेच्या नांवानं शून्य, पण गुलामाचं शरीर मात्र अगदीं गुंडगोल ! त्या पशूचं तुझ्यावर म्हणे भारीच प्रेम जडलं आहे !

**कुब्जा**—भारीच लुब्रा आहे मेला ! मीं किती नको नको म्हटलं, तरी तस्सा मेला लाळ घोटीत असतो माझ्याजवळ !

**चाणूर**( स्वगत )— मी लुब्रा-लाळघोट्या काय ? (उघड) त्यानंच तर मला सांगितलं, कीं कुब्जेसारख्या जगावरून ओंवाळून टाकलेल्या कालिकेला मी आपलं हृदय अर्पण केलं, तरी ती हडळ तुझ्यावरच भाळली आहे !

**कुब्जा**—त्या माकडाला मीं कांहीं आपणाकडे पाठविलं नव्हतं !

**चाणूर** ( स्वगत )— आतां कृष्णाची निंदा आणि आपली स्तुति करावी ! ( उघड ) प्रिये कुब्जे, त्या चाणूरापेक्षां माझ्यामध्यें असा कोणता गुण तुला अधिक वाटला, म्हणून त्याला धिक्कारून तूं माझ्यावर इतकं प्रेम करावंस ? कंसासारख्या महामंडलेश्वराचा तो उजवा हात असून, तो दाखवील त्या दिशेला आणि सांगेल त्या वेळीं सूर्याला उगवणं आज भाग पडत आहे. कृष्णाला—म्हणजे मला—मथुरेबाहेरच्या आंबराईत उद्यां सकाळीं आपणासमक्ष, मागून हळूच कट्यार खुपसून ठार करण्याची कामागिरी कंसमहाराजांनीं त्या चाणूरावर अगदीं विश्वासानं संपविली असून त्याबद्दल त्याला गोकुळची जहागिरी आणि भ्रष्ट केलेली राधा अर्पण करण्याचं वचन दिलं आहे. प्रिये कुब्जे, खरोखर तुला सांगतों, या चाणूरासमोर तो कृष्ण म्हणजे कःपदार्थ आहे !

**कुब्जा**(स्वगत)—या चाणूरासमोर, आणि तो कृष्ण ! म्हणजे हा कांहीं कृष्ण खास नव्हे ! ( न्याहाळून पाहून ) अगबाई ! हा मेला चाणूर ! काय तरी बाई

मेल्याचं कपट हें ! मेला नाथांचं सोंग घेऊन मला फसवायला आला, नाहीं का ? बोलतां बोलतां श्रीकृष्णावर गुप्त हल्ला करण्याची कंसानं योजलेली कामगिरी प्रेमाच्या भरांत मेला ओकून गेला, हे परमेश्वराचे केवढे उपकार आहेत !

**चाणूर**—प्रिये कुब्जे, तूं अशी स्तब्ध कां ? हा चाणर-नव्हे, हा कृष्ण—

**कुब्जा**—दम धर मेल्या ! हा तुझा असा कान पकडतें, आणि तुला महाराजांसमोर नेतें. आज महिना पंधरा दिवस तूं माझ्यामागं कसा हात धुऊन लागला आहेस, तेंही महाराजांना चांगलं तिखटमीठ लावून मी सांगतें. युवराजांबरोबर गोकुळला जाऊन त्यांना कांहीं मदत न करतां कृष्णाला भिऊन तूं तोंड लपवून कसा बसलास, आणि कृष्णाच्या वेषानं मला फसवायला कसा आलास, तेंही आणखी सांगतें. म्हणजे महाराज, तुझं चांगलं चंदन काढून, मेल्या, तुझी यथासांग पूजा करतील !

**चाणूर**—कुब्जे, सोड-सोड मला. मी तुझ्या पायां पडतों. आजपासून मी तुला कधीं त्रास देईन, तर बजरंगाचीच शपथ ! एवढी एकच वेळ मला क्षमा कर. नाहीं तर महाराज मला उभा जाळून खाक करून टाकतील ! तुझ्या अधरामृताची सारी अशा सोडून आई म्हणून हवं तर तुझ्या पायांवर मी नाक घांसतों.

**कुब्जा**—बरं, एकवार तुला क्षमा करून सोडून देतें. पण दोन अटींवर हो ! मी विचारीन ती माहिती वेळोवेळी मला खरी सांगायची; आणि दुसरा तो खवीस—तो मेला मुष्टिक माझ्या पाठीमागं लागला आहे, त्याला पोट फुटेपर्यंत यथेच्छ मुष्टिमोदक चारायचे !

**चाणूर**—कबूल कबूल ! तुझ्या दोन्ही अटी मला कबूल आहेत. तुझी दुसरी अट तर पहिल्यापेक्षांहि फारच गोड आहे ! तुझ्या प्रेमांतही मुष्टिक माझा प्रतिस्पर्धी होता काय ? केशीच्या वधाच्या वेळीं लपून बसण्याच्या कामांतही तो माझा प्रतिस्पर्धी होताच ! त्याच्यावर मला सूड घ्यायचाच आहे-तो तुझ्या आज्ञनं आतां दुप्पट घेईन.

**कुब्जा**—पण पहा अं-मी वाटेल त्या वेळीं तुझी परीक्षा घेईन. तींत जर तूं उतरला नाहींस, तर महाराजांकडून तुला मी आगीच्या विमानांतून थेट स्वर्गापर्यंत चढवीन ! याद राखून रहा पुरती !

**चाणूर**—कबूल कबूल ! ( स्वगत ) बजरंगा ! खूब शासन दिलंस बाबा ! पुन्हां म्हणून या हडळीचं नांव काढायचा नाहीं. आतां राधेवरच आपली भुकी



चाणूर—कुब्जे, तुझ्या एका अटींतून मी मुक्त झालों ना? (पृष्ठ ५१.)

नजर ठेवून राहिलं पाहिजे. भाकर शिळी असली, तरी सत्तेची! भुकेला तरी उपयोगीं पडेल!

**कुब्जा**—कृष्णचंद्रा, देवाच्या दर्शनाची आशा करीत बसावं, तों अकल्पित पिशाचाचं दर्शन व्हावं, तशी या अभागिनीची अवस्था तूं केलीस. पण देवा, तुझ्याकडे तरी काय दोष? कृतसंकल्प विसरून तुझ्या रूपानं आलेल्या या चांडाळाकडे मीं कां पहावं? त्याची पापी भाषणं मी कानांनीं कां ऐकावीं? कृष्णदेवा, तुझ्या ब्रीदाला बोल लावायला ही कुब्जा कोणत्या झाडाचा पाला? एकच वेळ, कृष्णचंद्रा, एवढी एकच वेळ या दीन दासीला तूं क्षमा नाहीं का करणार?

[ राग–बसंत; ताल–एकताल; चाल–रैस रैस पिवन० ]

**प्रेमसिंधु तूं विशाल प्रणयसलिल शांतशील वितरुनियां जीववीसि जात–जाल सकलकाल ॥ ध्रु० ॥ कीटकासि मजसमान सानाहुनि नीच सान अवगणिशिल का दयाल? ॥१॥**

[ राधेच्या वेषानें मुष्टिक येतो. ]

**मुष्टिक** (स्वगत)—अहाहा! माझ्या हृदयवल्लभेनं डोळे मिटून कुणाचं ध्यान चालविलं आहे बरं? दुसरं कुणाचं असणार? त्या काळ्याचं अथवा त्या राधेचं असेल! ( तिच्याजवळ येऊन उघड ) प्रिय सखि कुब्जे, माझ्या कृष्णाची प्रियवल्लभा तूं! म्हणून तुला भेटायला ही मी राधा वेगानं धांवत आलें हो! मथुरेंत आल्यावर मी पाणी देखील प्यायलें नाहीं बरं!

**चाणूर**( त्वेषानें प्रवेश करून, मुष्टिकाला खालीं पाडून, त्याला बुकलीत)—हा तुझा कृष्ण तुला हवं तेवढं पाणी पाजायला तयार असतां तुला ते श्रम घेण्याचं कारणच नाहीं! पी पाणी–पी पाणी! पुरे? भागली तहान?

**कुब्जा**—अगबाई! हें काय?

**मुष्टिक**—ओय, ओय, ओय! हें आहे तरी काय?

**चाणूर**—परवां कृष्णाची कणीक मऊ करायची राधेला लहर लागली होती; पण आज गाडं उलटलं! आज राधेला पोट फुटेपर्यंत पाणी पाजायची कृष्णाला लहर आली आहे! पी पाणी–पी पाणी! कुब्जे, तुझ्या एका अटींतून मी मुक्त झालों ना?

**कुब्जा**—अगदीं पूर्णपणं! तूं जा आतां. पण आतांसारखा जवळपास राहूं नकोस–बजावून ठेवतें. ( चाणूर जातो. ) मुष्टिका, तुला मी असाच्या असा महा-

राजांकडे नेतें, आणि आज महिना पंधरा दिवस तूं मला जीव कसा नकोसा करून सोडला आहेस, हे मी त्यांना सांगतें.

**मुष्टिक**—अग बया, नको, तेवढं नको करूंस! हें चेहऱ्याचं मुंडण केलेलं पाहून महाराज माझ्यावर आधींच रागावले आहेत. त्यांना केशीबद्दलच्या क्षौराची थाप मारून मी कसाबसा सुटलों आहें! पुन्हां आणखी माझ्यावर आग नको पाखडूं—माझी आई ती!

**कुब्जा**—केशीबरोबर गोकुळला जाऊन ऐनवेळीं त्याला कांहींच मदत न करतां, कृष्णाला भिऊन तूं कसा लपून बसलास, हेंही मला सारं कळलं आहे बरं! या तुझ्या पराक्रमाबद्दल महाराजांकडून तुला चांगलं बक्षीस मी देववितें.

**मुष्टिक**—बक्षीस! सुळावरची पोळी, दुसरं काय? माझे आई, हे पहा कान पकडले: पुन्हां म्हणून तुझ्या वाटेला मी कधीं जाणार नाहीं. अगदी बजरंगाची शपथ! एवढी एकच वेळ मला क्षमा कर.

**कुब्जा**—करीन; पण एका अटीवर.

**मुष्टिक**—सांग, कोणती अट?

**कुब्जा**—मी तुला विचारीन ती माहिती मला वेळोवेळीं अगदीं खरी खरी सांगितली पाहिजेस तूं—

**मुष्टिक**—पण-पण—

**कुब्जा**—पण नाहीं आणि बीण नाहीं. नाहीं तर अशी जातें महाराजांकडे. अरे, तूं सांगितलेली माहिती मी कुणाला सांगणार नाहीं. मग तर झालं?

**मुष्टिक**—मग कबूल आहे तुझी अट!

**कुब्जा**—उद्यां सकाळीं मथुरेबाहेरच्या आम्रवनांत श्रीकृष्णाला गुप्तपणानं ठार करण्याविषयीं महाराजांचा तुला गुप्त हुकूम आहे कीं नाहीं? खरं सांग—

**मुष्टिक**—हो आहे! पण तुला ही गुप्त बातमी कळली तरी कशी? तुला हडळीला एखादं कर्णपिशाच साध्य आहे कीं काय?

**कुब्जा**—अरे एक कां? चांगलीं दोन लंबकर्ण पिशाचं मीं साध्य करून घेतलीं आहेत! जा आतां; पण कधीं विचारलेली माहिती सांगायला तूं टंगळमंगळ केलीस, तर—

**मुष्टिक**—नाहीं ग आई! मुलावर अशी अवकृपा कां? [ जातो.

**कुब्जा**—दैवानंच खैर केली, म्हणून या मूर्खाच्या तोंडून कंसानं योजिलेल्या

कृष्णवधाच्या कृष्णकारस्थानाची बातमी मला ऐन वेळेवर कळली. (विचार करून) हो–धनुर्यागासाठीं राधा आपल्या पतीबरोबर मथुरेला आली आहे; तिच्या कानां-वर ही गोष्ट घालावी. पुढील अनर्थ टाळायला ती कृष्णसखी समर्थ आहे.

[ राग–करहरप्रिया; ताल–त्रिताल; चाल–सीतापते भज० ]

**तारावया जन पातला हा। परि शल्यसा हो कुजनांस ॥ध्रु०॥**
**सुरनंदना सुखदा त्यजोनी। अघ सेवितें नारकवास ! ॥ १ ॥**

[ जाते.

---

## प्रवेश चवथा

[ गोकुळाजवळील वनभाग. अक्रूर आणि कृष्ण प्रवेश करतात. जवळ कंसाचा सुसज्जित राजरथ. ]

**कृष्ण**—अक्रूरजी, जगांतील सर्व मोहांमध्यें स्वजनांचा मायामोह मोठा क-ठीण आहे. मला निरोप देतांना बाबांची आणि आईची काय करुणास्पद स्थिति झाली, ती तुम्ही प्रत्यक्षच पाहिलीत. बलरामदादांना तर तो करुण देखावा मुळीं-च पहावेना ! तेव्हां त्यांनी कांहीं तरी निमित्त सांगून वाड्यांतून पाय काढला, आ-णि 'परस्पर तुम्हांला मथुरेत येऊन भेटतों,' असें सांगून ते निघाले. शेवटीं, बाबां-च्या आणि आईच्या मूकरूदनरूपी पडत्या फळाची आज्ञा घेऊन मी वाड्याबाहेर पडलों. स्वजनांचा आणि गोकुळचा मायामोह मला क्षत्रियोचित कर्तव्यासाठीं सो-डावा लागत आहे. अक्रूरजी, माझ्यामध्यें कर्तव्याची कांहीं जाणीव कुणीं उत्पन्न के-ली असेल, तर ती माझी वंद्य मातुःश्री, आणि माझा सद्गुरु राधा यांनीं—

[ राग–जीवनपुरी; ताल–त्रिताल; चाल–तोरे नगरिया० ]

**वितरुनि उपला चैतन्य या। सद्गुरु हे थोर या करिति दया ॥ध्रु०॥ पितरीं मजला अर्पुनि देहा जगतीं दिधलें अवतारा। गुरु परि नर या शिकविति व्हाया ॥ १ ॥**

कंसानं कारवाई करून अनयाकडून राधेला बळजबरीनं मथुरेला नेवविलं, हें दे-खील तिच्याच चतुर योजनेचं फल असावं, असा मला संशय येतो. अक्रूरजी, मा-झ्या राधामाईच्या या प्रचंड आत्मत्यागाची जगाला कधीं यथार्थ कल्पना येईल कीं नाहीं, याबद्दल मला शंका वाटते. हाय ! मला तर अशी भीति वाटते, कीं कदा-चित् राधामाईच्या शुभ्र नांवाला जग कायमचाच कलंक लावून बसेल ! ते कांहीं

असलं, तरी इतर कर्तव्यांच्या हांकांना गुरुकर्तव्याच्या हांकेचीही जोड मिळून त्याची ओढ माझ्या मनाला सारखी लागली आहे. अंधकआजोबांनीं तुमच्याबरोबर पाठविलेल्या निरोपानं त्या ओढीला पुन्हां दुप्पट जोर चढला आहे. चला, अक्रूरजी, रथ लवकर हांका. नाहीं तर माया आपला पाठलाग करीत येईल.

[ इतक्यांत रथापुढें गोपगोपींचा समुदाय येऊन उभा रहातो. ]

**पहिला गोप**—कृष्णा, मी इतका म्हातारा झालों आहें, पण मी तुझे पाय धरतों. आम्हांला या नगरांत अरण्यवासी करून जाऊं नकोस.

**पहिली गोपी**—कान्ह्या, तुझी विनवणी करतां करतां हृदयांतलं रक्त आणि डोळ्यांतील अश्रु देखील आटून गेले. पण तुला दया नाहीं! कृष्णा, शेवटीं केंसानं असा गळा कापायचा होता, तर इतकीं वर्षं जिवाची माया तरी आम्हांला कां लावलीस ? नाहीं-आम्ही तुला जाऊं देणार नाहीं.

**इतर गोप-गोपी**—नको कृष्णा, नकोरे आम्हांला टाकून जाऊं—

**कृष्ण**—मातांनो, भगिनींनो, गोपबंधूंनो, माझा गळा दाटून आल्यामुळं माझ्या तोंडांतून शब्द निघत नाहीं. या अभागी कृष्णावर दया करा, आणि त्याचं कठोर कर्तव्य लक्षांत घ्या. काल मीं तुमची इतकी समजावणी केली ना ? मी तुमचे पाय धरतों.

**चंद्रिका** ( एकदम पुढें सरून, कृष्णाचे पाय धरते. )—कृष्णदेवा ! माझ्या हातून तुझा एक अक्षम्य अपराध झाला आहे—

**कृष्ण**—चंद्रिकाताई, हें तूं काय म्हणतेस ?

**चंद्रिका**—देवा, राधेच्या मत्सरानं हृदय जळून गेल्यामुळं तुझ्याबद्दल आणि राधेबद्दल अनयाच्या आणि त्याच्या आईच्या हृदयावर मी एकसारखा जलाल विषाचा वर्षाव करीत आलें. माझ्या पापाला सीमा नाहीं. माझं वर्तन घोर-पातकी ! नाहीं, देवा, माझ्या हृदयाच्या पश्चात्तापानं चिंधड्या चिंधड्या उडताहेतरे ! देवा, आपल्या हातानं या पापिणीचा अंत करून टाक—

**कृष्ण**—चंद्रिके, या तुझ्या अन्यायी वर्तनाचा तुला खरा पश्चात्ताप झाला असेल, हें स्मशानवैराग्य नसेल, माझ्याबद्दल तुझ्या हृदयांत दयेचा बिंदु जरी असेल, तर आजच्या आज तूं मथुरेला निघून ये, आणि तिथं अनयाला भेटून त्याला खरा खरा वृत्तांत सांगून, राधेची अंतःकरणपूर्वक क्षमा माग.

**गोपी**—कान्ह्याच्या रस्त्यावर आडव्या पडून त्याची वाट आपण अडवून धरूं

या. मग हवं तर त्याच्या कठोर कर्तव्याला आमच्या हाडांचा चुरा करून कुठं तें जाऊं द्या.

**कृष्ण**—बंधूंनों, भगिनींनो, या कठोर कृष्णाला क्षमा करा. माझ्यानं आतां अधिक बोलावत नाहीं. माझी आठवण ठेवा. तुमच्या पवित्र, प्रेमळ सहवासाची आठवण मला जन्मोजन्मीं राहील. अक्रूरजी, हांका रथ एकदम. ते पहा, मागून बाबा आणि आई इकडेच धांवत येत आहेत. तीं एकदां इथं येऊन पोहोंचलीं, म्हणजे मग त्यांच्या मायामोहांतून पार होणं केवळ अशक्य होईल.

[अक्रूर रथ हांकून नेतो; सर्वत्र हलकल्लोळ होतो. नंद व यशोदा त्वरेनें येतात.]

**नंद**—गेला, देवि यशोदे, कान्हा गेला! तुझा, माझा, गोपांचा, गोपींचा, साऱ्या गोकुळचा कर्तव्यकठोर आत्मा आम्हांला प्रेतवत् चैतन्यशून्य करून निघून गेला!

[राग-जोगी; ताल--दीपचंदी; चाल-जोगि नहीं० ]

**गोकुल हो दहनभूमि आतां। लोपुनि सुंदरता ॥ ध्रु० ॥ चैतन्याच्या भडकल्या चिता। अवसर हा भूतां! ॥ १ ॥ शोकरवानें भरली नगरी। त्यजि घन निःश्वसितां! ॥ २ ॥**

चल, देवि, चल!

**यशोदा**—आतां कुठं चलूं? महाराज, आतां गोकुळच्या स्मशानांत आपलं काय राहिलं आहे?

**नंद**—देवि यशोदे, विवेकानं शोक आवरला पाहिजे. आजवर तूंच ना कर्तव्याचा मार्ग कृष्णाला दाखवीत आलीस? तूंच असा शोक करूं लागलीस, म्हणजे या गोपगोपींनीं कुणाच्या तोंडाकडे पहावं?

**यशोदा**—चला, गोपींनो, दैवाच्या दारुण प्रहारापुढं देवांनाही मान वांकवावी लागते; मग आपली काय कथा? [जातात.

---

## प्रवेश पांचवा

[मथुरेबाहेरील आम्रवन. राधा प्रवेश करते.]

**राधा**—कुब्जा म्हणजे एक सामान्य दासी; पण तिच्या हृदयांत श्रीकृष्णाबद्दल विलक्षण शुद्ध प्रेम मला आढळून आलं, आणि त्या प्रेमानंच दुष्ट कंसाची कृष्णवधाची योजना मला स्पष्ट करून दाखविली. काय तरी त्या दुष्टाचं कुटिल

कारस्थान हें ! देवा, तुमच्या दयेनं राधा आजवर तोंडानं सुंदर विचार बोलून दाखवीत होती. परंतु हातानं प्रत्यक्ष कृति करण्याची वेळ आज तुमच्या आदेशानं तिच्यावर येऊन ठेपली आहे. या प्रसंगीं वज्राची शक्ति तिच्या हाताला आणि हृदयाला द्या, एवढंच हात जोडून तुमच्याजवळ मागणं आहे.

[ राग—पूर्या धनाश्री; ताल—धीमा तिताला; चाल—चईंदरा जगदा० ]

**वसुंधरा वदना निरखि ज्याच्या । रक्षाया झणिं ये तया वीरा ॥ध्रु०॥ कृष्ण तुझा चिर तूंहि तयाचा । निजत्राणिं रक्षीं जन सारा ॥ १ ॥** [ जाते.

[ कंस व सुनाम प्रवेश करतात. ]

**कंस**—सुनाम, तूं जा आतां. माझ्याबद्दल कसलीही काळजी करूं नकोस.

**सुनाम**—महाराज, युवराज केशीसुद्धां त्या प्रसंगीं मला असंच अभयवचन देऊन गेले. त्याच निर्दय कपट्याशीं आज आपलीही गांठ आहे.

**कंस**—सुनाम, केशी जमिनीवर होता; कंस सिंहासनावर आहे, हें तूं विसरूं नकोस. डोकं नेहमीं पायांपासून पुरुषभर उंचावर असतं. बरं, तूं जा आतां.

**सुनाम**( स्वगत )—इतका अहंकार ! लक्षण बऱ्याचं नाहीं. ( उघड ) जशी महाराजांची आज्ञा ! [ जातो.

**कंस**—भोळा सुनाम ! नुसता पराक्रमी नरसिंह केशी आणि कपटी क्रूरपणाची मूर्तिच असा हा नरशार्दूल कंस, यांच्या कर्तबगारीत जमीनअस्मानचं अंतर असलं, तर त्यांत काय नवल आहे? पण हें काय बरं? ठरलेली वेळ तर वाऱ्यांतच टळून गेली. मग तो कपटी कोल्हा या सशाबरोबर अजून कसा आला नाहीं? [ कृष्ण प्रवेश करतो. ] सम्राटाचा सेनापति हा महामंडलेश्वर कंस तुझ्यासमोर उभा असतां त्याला अभिवादन न करतां बेदरकारपणं तूं उभा आहेस ! यावरून तूं माझा भाचा कृष्ण असावास, असं मला वाटतं.

**कृष्ण**—होय, तोच मी—

**कंस**—अक्रूराला माझी वकिलात देऊन मी तुझ्याकडे पाठविला होता. त्यानं तुला माझे सर्व विचार कळविले ना ? तुझा अचाट पराक्रम, अद्भुत बाहुबल आणि प्रचंड बुद्धिसामर्थ्य यांची खरी योग्यता न कळल्यामुळं मीं आजपर्यंत तुझ्याशीं व्यर्थ वैर केलं; आणि त्याबद्दल तूं मला शासनही चांगलं केलंस ! असो, झालं तें गेलं. त्याबद्दल मीही कांहीं मनांत आणीत नाहीं, आणि तूंही आ-

णूं नकोस. माझ्या पूर्ववर्तनाबद्दल मला अतिशय पश्चात्ताप झाला आहे.

**कृष्ण**—कपटी ढोंग्या, कशाला हें पश्चात्तापाचं सोंग माझ्यासमोर ? माझीं जन्मदातीं मातापितरं याच क्षणीं तुझ्या बंदिशाळेंत यातना भोगीत खितपत पडलीं आहेत ! हेंच का तुझ्या पश्चात्तापाचं लक्षण ? कृष्णाची दृष्टि तारवटून गेलेली नाहीं–ती पूर्ण अंतर्भेदी आहे.

[ राग–अडाणा; ताल–त्रिताल; चाल–तदेर्ना देर्ना० ]

**कठोर-घोर-कालकूट-विकटसारा । जाणें या कणकण तव हृदया । गगनगत जेंवि रविकिरण तिमिरघना ॥ध्रु०॥ काल कालगुण निवडुनि अघगण । निर्मि तव हृदय अशुचि महा । घनतामस हा निरय, नच इतर ! ॥ १ ॥**

**कंस**—कृष्णा, मनुष्याच्या सहजगत्या झालेल्या नजरचुकीबद्दल असं आकाशपातळ एक करण्यांत काय अर्थ आहे ? तुझ्या माझ्या हृदयांची बंधनं जुळतांच, क्षणार्धात वसुदेवदेवकीचे बंध तटातट तुटतील !

**कृष्ण**—तुझं म्हणणं तरी काय आहे ? बाबांच्या आणि आईच्या मुक्ततेसाठीं वाटेल तें न्याय्य कृत्य करायला मी तुझा बंदा गुलाम आहे.

**कंस**—असा शुद्धीवर ये. मी जे आतां तुला सांगणार आहें, तें तुझ्या आणि माझ्याही हिताचं आहे. तुझं दैवी बल आणि बुद्धिवैभव हीं जशीं मला मान्य आहेत, त्याप्रमाणंच माझाही पराक्रम, वैभव आणि बुद्धिबल ही तुलाहि मान्य असलीं पाहिजेत ! या सर्वांनीं परस्परांना खाऊन नामशेष करण्यांत तुझा आणि माझा फायदा काय आहे ? परस्परांच्या वैरामुळं परस्परांनीं रात्रंदिवस दारुण चिंतेंत आणि भयांत रहावं, यांत काय अर्थ आहे ? म्हणून माझी तुला अशी सूचना आहे, कीं गोकुळच्या जहागिरीच्या शेकडोंपट मोठी जहागीर, किंबहुना मथुरेच्या राज्याहूनही मोठं राज्य आणि त्रिभुवनाच्या मोलाचं अक्षय रत्नभांडार मी तुला जरासंधमहाराजांकडून देववितो. पण मथुरेपासून दूर–अगदीं दूर जाऊन, मला इथं माझं राज्यवैभव शान्तिसमाधानानं भोगूं दे. सांग, आहे तुला ही अट कबूल ?

**कृष्ण**—कंसा, मी आत्मतृप्त आहें. मला एका सुतळीचाही लोभ नाहीं. तूं देऊं केलेली प्रचंड जहागीर, राज्य अथवा अक्षय रत्नभांडार यांची मला बिलकूल जरूरी नाहीं. फार काय, तूं सांगत असलास, तर गोकुळची जहागिरीही म-

थुरेच्या सिंहासनाला अर्पण करून, दुःखाचा एकही निश्वास न टाकतां, मी एका वस्त्रानिशीं मथुरेच्या राज्यांतून बाहेर पडतों; तूं सांगशील तिकडे जातों; मथुरेच्या चतुःसीमेंत फिरून कधींही येत नाहीं—

**कंस**—वा! आणखी काय पाहिजे? आहेना हें सारं तुला कबूल?

**कृष्ण**—नंदयशोदा, वसुदेवदेवकी आणि राधामाई या परमेश्वरापेक्षांही पूज्य असलेल्या गुरुजनांच्या चरणांचं स्मरण करून तुला मी वचन देतों, कीं माझी एकच अट तूं पाळतांच, मीं तुला आतां सांगितलेल्या सर्व अटी पाळायला तयार आहें. माझ्या या वचनांत मीं तिळभरही माघार घेतली, तर मी कल्पांतापर्यंत रौरवांत पचत राहीन!

**कंस**—सांग तर मग, लौकर सांग तुझी अट.

**कृष्ण**—माझी अट फक्त एवढीच आहे, कीं केवळ अन्यायानं, अनीतीनं संपादन केलेल्या मथुरेच्या सिंहासनावरून उतरून, तूं आपल्या हातानं, त्याच्या न्याय्य अधिकाऱ्याची–तुझ्या परमपूज्य पित्याची–उग्रसेनमहाराजांची–त्याच्यावर स्थापना करावीस—

**कंस**—दुष्टा, केवढी माझी निराशा केलीस एकदम! ब्रह्मानंदाच्या उच्च शिखरावरून तूं मला एकाएकीं निराशेच्या खोल पाताळांत लोटून दिलंस! कृष्णा, घे, आपली ही अट परत घे. तुला देऊं केलेल्या वैभवाच्या अनंतपटीनं वैभव तुला देतों—

**कृष्ण**—नको–या निर्लोभ कृष्णाला स्वर्गासकट त्रिभुवनाच्या वैभवानंही मोह पडणार नाहीं. उग्रसेनमहाराजांना मथुरेच्या सिंहासनावर तूं बसवितांक्षणींच मी हिमालयांत तपश्चर्येला निघून जाईन.

**कंस**—ऐक, कृष्णा, माझं ऐक! चालत आलेल्या लक्ष्मीला हट्टानं दूर लोटूं नकोस—

**कृष्ण**—कंसा, सर्व परस्त्रियांकडे मी मातृदृष्टीनंच पहातों. या कृष्णाच्या हृदयाला मोह पडेल अशी साऱ्या विश्वांत जगन्मंगलाशिवाय एकही वस्तु नाहीं.

**कंस**—घमेंडखोरा, नाहींना तूं आपला हट्ट परत घेत? अविचारी हटवाद्या, या हट्टाचीं विषारी फळं तुला भोगावीं लागतील!

**कृष्ण**—कृष्णाच्या हृदयाला जगांत जसा एकही मोह नाहीं, तशी एकही भीति नाहीं!



**राधा**--कृष्णा, उजवी बाजू संभाळ—वज्रमुष्टि हाण ! (पृष्ठ ५९.)

**कंस**—भोग तर मग आपल्या हट्टाचीं फळं !

[ टाळी वाजवितो. कृष्णाच्या एका बाजूनें चाणूर व दुसऱ्या बाजूनें मुष्टिक हत्यारी सरसावून येतात राधा चाणूराच्या प्रहाराच्या आड येऊन त्याचा वार आपल्या हातावर सांवरते. ]

**राधा**—कृष्णा, उजवी बाजू संभाळ. वज्रमुष्टि हाण—

[ कृष्णाच्या वज्रमुष्टीनें मुष्टिक एकदम मूर्च्छित होऊन पडतो. दुसऱ्या मुष्टीनें चाणूर आणि तिसरीनें कंस मूर्च्छित होतात. ]

**कृष्ण**—गुरो, राधामाई, काय हें अपूर्व शिष्यवात्सल्य !

**राधा**—जगन्मंगलाच्या मार्गांत पहिलं पाऊल टाकण्यांत विजयी झालेल्या श्रीकृष्णा, तुझा सदासर्वदा असाच विजय होईल, असा माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे.

[ राग-मालकंस; ताल-झपताल; चाल-ये हो राजकुंवर० ]

**होई आज गमतें प्रभु तो सफलकाम ॥ध्रु०॥ भव्य जनकल्याण-। भवन झणिं निर्माण। करवु तव करिं धन्य। तो स्वर्गसम ॥ १ ॥**

[ पडदा पडतो. ]



# अंक चवथा

## प्रवेश पहिला

[मथुरेच्या राजवाड्यांतील एक दालन. कुब्जा प्रवेश करते]

**कुब्जा**—देवि राधे, आज कृष्णचंद्राच्या प्राणांचं रक्षण तूं केलंस ! तुझ्या भाग्याला सीमा नाहीं ! (थांबून) राधेच्या आत्मत्यागानं खवळून जाऊन नराधम कंसानं तिला तिच्या पतीपासून जबरदस्तीनं उचलून आणून कुठं तरी गुप्त ठिकाणीं ठेवलं आहे, असं मला समजलं आहे. तो पापी दुरात्मा त्या देवीवर कांहीं तरी भयंकर संकट आणल्याखेरीज रहाणार नाहीं हें खास ! नीच कंसाचे ते दोन हस्तक-चाणूर आणि मुष्टिक यांना या नवीन कारस्थानाची कांहीं तरी माहिती खात्रीनं असली पाहिजे. त्यांपैकीं एखादं सावज माझ्या हातीं लागेल, या आशेनं मी ही इकडे आले-तो पहा, तो एक सर्प मला टाळून हळुच पळून जाऊं पहातो आहे. मुष्टिका, अरे ए मुष्टिका !—

[मुष्टिक प्रवेश करतो.]

**मुष्टिक**—ही शिंची ब्याद अगदीं हात धुऊन माझ्या मागं लागली आहे ! कालपासून मी हिच्या वाटेला जात नाहीं, तर हीच माझी वाट अडवून बसली आहे ! वाटमारी आहे पक्की ! मोठ्या आमच्या मातुःश्री बनल्या आहेत !

**कुब्जा**—मुष्टिका, असा मला चुकवून कुणीकडे चालला आहेस ? मी कोण, त्याची आठवण इतक्यांत बुजली वाटतं ?

**मुष्टिक**—नाहीं ग माझे आई ! तुझी आठवण इतक्या लवकर कसची बुजते ?

**कुब्जा**—का म्हटलं, विसरलास सारं इतक्यांत ? दगलबाजी करूं नकास हां माझ्याशीं ! नाहीं तर अगोदर कपाळमोक्ष आणि मग भडाग्नि अशी उलटी माज महाराजांकडून तुला दाखवीन ! त्यांनीं तुझा हा मुंडन केलेला नारळ पाहिलाच आहे ! तुझा हाडवैरी तो मेला चाणूरही अद्यापि जिवंत आहे—

**मुष्टिक**—माझ्या आई गंगे, कां मला उगीच छळतेस अशी ?

**कुब्जा**—तर मग, मला खरं सांग. राधेची उचलबांगडी करून महाराजांनीं तिला कुठं ठेविली आहे? तुझा पहारा तिथं केव्हां केव्हां असतो?

**मुष्टिक**—अग तूं सटवी अशी आहेस तरी कोण? या साऱ्या गुप्त बातम्या तुला नेमकं सांगतं तरी कोणतं कर्णपिशाच?

**कुब्जा**—आहे आपलं तुझ्यासारखंच एक! बरं मग मला काय तें खरं सांग; नाहीं तर आंतल्या राधेसारखी बाहेरची पुरुषी राधा महाराजांना दाखवून–

**मुष्टिक**—राधेला कालभवनमहालाच्या तळघरांत ठेवलं आहे. रात्रीं माझा पहारा तिथं असतो. आज मध्यरात्रीं राधेला भ्रष्ट करून तुझ्या त्या काळभैरवावर पक्का सूड घ्यायचा महाराजांचा विचार आहे.

**कुब्जा**—तर मग त्या वेळी आम्हां दोन तीन माणसांना तूं मुकाट्यानं आंत सोडलं पाहिजेस हां! भिऊं नकोस. तुझ्यावर कांहीं देखील तोहमत न येण्याची व्यवस्था मी करीन—

**मुष्टिक**—ठीक आहे. तूं सांगशील तें मान्य करणं मला भागच आहे!

[ जातो.

**कुब्जा**—अहाहा! आज माझ्या जीविताचं खरं सार्थक झालं! माझ्या जीवितेश्वराच्या प्राणरक्षणाला आज माझा थोडा तरी उपयोग झाला!

[ राग–देसकार; ताल–त्रिताल; चाल–सबरस आकर दे० ]

**अवधि न भाग्यबलातें। द्वेषपात्र मलिनगात्र हतललना अमराधिपा मधुरा ॥ ध्रु० ॥ योगें स्वातिसमयीं घनजलें शुक्तिपुटीं जन्मती सतेजा मुक्ता प्रखरा! ॥ १ ॥**

[ जाते.

---

## प्रवेश दुसरा

[ कालभवनमहालाचें तळघर. राधा बसली आहे. ]

**राधा**—आम्रवनांत कंसाला चुटकीसरसा चिरडून टाकण्याची संधि आली असतां, श्रीकृष्णानं तिचा दुरुपयोग केला नाहीं. श्रीकृष्णा, तूं आमच्यांतच जन्मून आमच्यांतच तूं लहानाचा मोठा झाला आहेस, यामुळं तुझ्यामधील परमेश्वरी अंश आमच्या सामान्य दृष्टीला दिसला नाहीं, तर एक वेळ तें क्षम्य आहे; पण तुझे अद्भुत पराक्रम, तुझा अपूर्व स्वार्थत्याग, कर्मसंन्यासी यतींनाही अलभ्य अशी

तुझी निर्लोभता, केवळ जगत्पित्यालाच शोभेल अशी जगत्कल्याणाविषयींची तीव्र तळमळ, हे तुझे सद्गुण पदोपदीं आमच्या नजरेंत भरत असतांही आम्हीं तुझ्या भजनीं लागूं नये, उलट, तुझ्या उच्च आकांक्षांत प्रतिक्षणीं अडचणी उपस्थित करून तुझ्याशीं उघड शत्रुत्व करावं, हें आमच्या जन्मोजन्मींच्या पातकांचं फल होय ! दयामय परमेश्वर तरी या पातकांची क्षमा करील काय ? नुसत्या पश्चात्तापानं नाथांची शुद्धि होईल का ? चंद्रिकेनं मुद्दाम गोकुळाहून धांवत येऊन नाथांपाशीं आपल्या साऱ्या कपटकृति मोकळ्या मनानं उघड केल्या; तेव्हांपासून नाथांची वृत्ति अगदीं बावरल्यासारखी दिसूं लागली. पश्चात्तापानं त्यांचं हृदय जळूं लागत आहे, इतक्यांत ज्यावर नाथांनीं माझ्या हृदयशोधनाची कामगिरी संपविली होती, त्या कपटी नराधमानं माझ्या नाथांपासून मला बळजबरीनं इथं आणून ठेवलं. त्या वेळीं त्यांची काय स्थिति झाली असेल ! नाथ, दैवानं घातलेल्या अंजनानं तुमची दृष्टि आतां साफ निवळली असेल; परंतु ती फार उशिरां निवळली ! श्रीकृष्ण पूर्ण निष्पाप, आणि तुमची हृदयवल्लभा राधा पूर्ण पतिव्रता आहे, हें तुमच्या हृदयाला पटत असेल, तोंच ती आपल्या हातानं हृदय चिरून स्वर्गलोकीं जाईल, आणि श्रीकृष्णाच्या हातून जगदुद्धाराचं कार्य तडीला जावं आणि पश्चात्तापानं शुद्ध झालेल्या तुम्हाला क्षमा करावी, असं विनवीत देवाच्या पायांवर ती लोळण घेईल !

[ राग-भैरवी; ताल-त्रिताल; चाल-तुम जागे कौन० ]

**नच मानसा आशा प्राणेशा ! आतां अन्या या ॥ ध्रु० ॥ विश्व-**
**मंगला प्रिय कृष्णाला साह्य करीं मिळो प्रेमें आपुल्या ॥ १ ॥**

त्या चांडाळानं सांगितलेली पापी वेळ तर भरत आली. दिव्य शस्त्रा, साध्वींच्या हृदयांचा ऐन संकटाच्या वेळीं ठाव घेऊन त्यांची मुक्तता करणाऱ्या पातिव्रतांच्या पाठिराख्या, माझ्या संकटांत उडी घ्यायला तयार हो ! अगबाई ! ही त्या अधमाचीच चाहूल—

[ कंस प्रवेश करतो. ]

**कंस**—राधे, मग काय तुझा विचार ठरला ?

**राधा**—पापी दुरात्म्या, कसला विचार ? आजपर्यंतच्या तुझ्या साऱ्या पातकांचा विचार करणारा परमेश्वर मथुरेंत आज अवतीर्ण झाला आहे, समजलास ?

**कंस**—होय, राधे, कृष्णाचे पराक्रम अद्भुत आहेत, हें मी कबूल करतों.

तुझ्यासारख्या भोळ्याभाबड्या स्त्रीला तो प्रत्यक्ष परमेश्वर वाटावा, अशींच त्याचीं एकएक कृत्यं आहेत, हेंही खोटं नाहीं. पण तुझ्या त्या परमेश्वराचाही सवाईपरमेश्वर हा कंस आहे, हें ध्यानांत ठेव. बोल राधे, बोल. सहज, शब्दाच्या फेंकीसरशीं आपलीं कामं करून घ्यायची मला संवय आहे. मोठमोठे पराक्रमी राजे माझ्या आज्ञेचं शेवटचं अक्षर तोंडाबाहेर पडण्यापूर्वीच ती अमलांत आणतात.कसलाच विलंब मला सहन होत नाहीं. बोल, माझी कोणती अट तुला कबूल आहे ?

**राधा**—बेशरमासारखा काय विचारतोस ? कृष्णाला तुझ्या पातकी तोंडाची पूर्ण कल्पना आली नाहीं. नाहीं तर माझ्यासमोर पापी अक्षरं उच्चारणारी ही तुझी जिव्हां त्यानं तेव्हांच छाटून टाकिली असती! पिशाचा–राक्षसा !—

**कंस**—या वेळीं तुझ्या तोंडची हीं विशेषणं मला किती गोड वाटताहेत म्हणून सांगूं! ही मध्यरात्र पिशाचांच्या–निशाचरांच्या राक्षसी रंगविलासाची आहे. हें कालभवनांतलं भयाण तळघर पाताळाप्रमाणं पिशाचांच्या विलासाला योग्य आहे! राधे, तूं स्वर्गातल्या रंभा उर्वशी वगैरे अप्सरांना रूपानं लाजविणारी असलीस, तरी कृतीनं तूं पिशाची आहेस, अशी माझी आज सकाळीं पुरी खात्री झाली. मग, या पिशाचानं, या पिशाचवेळीं, या पिशाचतळघरांत या सुंदर मायावी पिशाचीसह राक्षसी रंगविलास कां उपभोगूं नयेत ? राधे, माझं म्हणणं आनंदानं कबूल कर, म्हणजे भरतखंडाची साम्राज्ञीच काय, पण तुला प्रत्यक्ष स्वर्गाची इंद्राणी करून सोडतों! राधे, इंद्राणीपदावर तुझा विशेष हक्क आहे! इंद्र कितीही झाले, तरी इंद्राणी एकच असते. अनय आणि कृष्ण असे तुझे दोन इंद्र झालेच आहेत! मग इंद्राप्रमाणं माझी सर्वथैव योग्यता असतां, मलाच तुझं इंद्रपद कां मिळूं नये ?

**राधा**—तुझ्या पापी दृष्टीला सारं जग पापी दिसलं, तर त्यांत काय नवल आहे ? माझ्या अनयराजांशिवाय जगांतले सारे पुरुष मला पित्यासारखे आणि भावांसारखे आहेत. माझे पतिदेव माझे परमेश्वर असून श्रीकृष्ण माझा पाठीराखा बंधु आहे—

**कंस**—राधे, तुझं पातिव्रत्याचं पुराण मला नको आहे. तुला मी ही शेवटची संधि देतों आहें. सांग, राधे, सांग–तुला भरतखंडाचं साम्राज्ञीपद पाहिजे आहे, का कंसानं बलात्कारानं भ्रष्ट केलेली पण्यांगना म्हणून मथुरेंत मिरवायची तुझी इच्छा आहे ?

**राधा**—अनयराजांच्या चरणांची एकनिष्ठ दासी आणि श्रीकृष्णाची बहीण म्ह-

णूनच ही राधा या जगांत कल्पांतापर्यंत मिरवीत राहील !

**कंस**—अस्सं काय ? ठीक आहे ! मग तुझा तो पाठीराखा भाऊ आणि तो मूर्ख अजागळ परमेश्वर येण्यापूर्वीच तुझा अस्सा हात धरून--

**राधा**—पतिव्रतांच्या पाठिराख्या! घे आतां उडी ! (राधा जंबिया मारून घेण्यासाठीं हात उगारते, तों कृष्ण, अनय आणि चंद्रिका त्वरेनें येतात. अनय राधेचा हात धरून जंबिया काढून घेतो; कृष्ण कंसाला वज्रमुष्टि मारून खालीं पाडतो. )

**कृष्ण**—दुष्टा, राधेचा पाठीराखा भाऊ कृष्ण, हा पहा तुझा काळ उभा आहे! या वज्रमुष्टीचा पराक्रम तूं विसरलास काय ? जा, इथून काळं कर--

**कंस**—दुष्टा, या उद्दामपणाचीं फळं तुला लवकरच भोगावीं लागतील !

[ जातो.

**अनय**—देवि, देवि, 'क्षमा कर' असं म्हणायला अनय जिवंत कुठं आहे ?

[ राग-जंगला; ताल-दीपचंदी; चाल-कृष्णजि तोरे० ]

**दावुं कसा मी तुज या मुखाला। जें धरि पापें श्यामलतेला? ॥ ध्रु० ॥ अनुतापाच्या प्रखरा ज्वाला । संजीवन परि देति नराला ॥ १ ॥**

**राधा**—नाथ, हें काय बरं असं बोलायचं ? आपल्या स्वजनद्रोहि वर्तनानं श्रीकृष्णाचं पुण्यकार्य सोपं झालं नसतं, तर खरंच सांगतें, मीं आपणाला कधींही क्षमा केली नसती. पण श्रीकृष्णा, तुम्ही सारी मंडळी या ठिकाणीं ऐनवेळीं आलां तरी कसे ?

[ कुब्जा येते. ]

**कृष्ण**—तें सारं या दयेच्या देवीच्या कृपेचं फळ ! राधामाई, या कुब्जेचं हृदय किती थोर आहे, याची मला देखील अजून नीटशी कल्पना आली नाहीं ! आज सकाळीं माझ्या आणि आतां तुझ्या जीविताचं रक्षण याच देवीनं केलं. आपणांवर गुप्त उपकार करणारी ही देवी आपलं मुख दाखवायलाही लाजत आहे, हा मोठा चमत्कार नव्हे का ?

**राधा**—देवि कुब्जे, श्रीकृष्णाचे प्राण वांचवून, तूं जगावर केवढे उपकार करून ठेवले आहेस, याची तुला कल्पनाही नाहीं !

**कृष्ण**—देवि, आपल्या या दिव्य दयेच्या मोबदल्यांत तूं या कृष्णाला जन्माचा ऋणी करून ठेवला आहेस !

**कुब्जा** ( स्वगत )—देवा, इतकं कुठलंरे या अभागिनीचं भाग्य ! (उघड) देवि राधे, या प्रसंगीं मीं इथं रहाणं योग्य नाहीं. इथून लवकर चला, एवढंच आपणां सर्वांना सुचवायला मी आलें होतें. हें ठिकाण सुरक्षित नाहीं. दुष्ट कंसानं जातांना तळघराचा दरवाजा लावून आपणां सर्वांना कोंडून टाकण्याचा प्रयत्न केला होता. पण मला साधारण ही कल्पना असल्यामुळं मी मुद्दाम मागं राहिलें. [जाते.

**राधा**—नाथ, माझ्या श्रीकृष्णाबद्दलचा आपला सारा संशय गेला, असं सांगून या दासीला धन्य करा.

**अनय**—गेला, सारा संशय गेला. या चंद्रिकाताईनं मला सर्व हकीगत सांगितली. देवि, तुझं सर्व भाषणही मीं बाहेरून ऐकलं आहे. या पापी दुरात्म्यामुळं श्रीकृष्णासारख्या शुद्ध महानुभावाला आणि तुझ्यासारख्या निष्पाप देवीला अनंत यातना भोगाव्या लागल्या ! श्रीकृष्णानं थोर अंतःकरणानं त्याबद्दल मला क्षमा केली नसती, तर आत्महत्येशिवाय मला सुटकाच नव्हती !

**चंद्रिका**—राधे, कोणत्या तोंडानं मी तुझी क्षमा मागूं ? या सर्व अनर्थाला कारण मीच चांडाळीण ! (पायां पडते.)

**कृष्ण**—चंद्रिकाताई, नको, राधामाईची क्षमा नको मागायला ! (राधेशिवाय सर्व जातात.)

**राधा**—देवा, केवढा आनंदाचा दिवस दाखविलास ! यापेक्षां श्रेष्ठ आनंद आतां एकच ! श्रीकृष्णाच्या कृपेनं तोही दिव्य आनंद जगाला लवकरच लाभेल !

[राग—जीवनपुरी; ताल—त्रिताल; चाल—कहत पिया मोरि०]

**धरित अहा ! मन आस पहाया । गुरु झाला हरि विश्वपदाला ॥ ध्रु० ॥ शांति विशाला पसरित जाला । मोद मधुरता दे मनाला । दिव्य सुधामय लोकमाला ! ॥ १ ॥**

[ जाते.

---

## प्रवेश तिसरा

[ यमुनेचा डोह. कुब्जा प्रवेश करते. ]

**कुब्जा**—आज माझा नाथ माझा आदर करून माझ्याशीं बोलला ! किती उदार माझ्या हृदयेश्वराचं हृदय! पण कृष्णचंद्रा, तुला या पापिणीच्या मनाची क-

ल्पना नाहीं! तुझ्यासारख्या जगन्मोहनावर स्वर्गींच्या देवांगनाही भाळून एकमेकीं-शीं स्पर्धा करांत असतील. त्या तुझ्यावर-विश्वसुंदरावर प्रेम करण्याचं पाप मीं केलं! माझ्या पापाला सीमा नाहीं! तुझ्या पुण्यदर्शनानं, तुझ्या अमृतमय भाषणानं, ही कुब्जा-धन्य त्रिवार धन्य झाली असली, तरी तिच्या दर्शनभाषणांचा ताप तुला पुन्हां न व्हावा म्हणून, या ब्रह्मानंदाच्या ऐन भरांत तिला आपला पापी अवतार संपविलाच पाहिजे! नाहीं, कृष्णदेवा, असा दुर्लभ भाग्याचा दिवस मला पुनरपि कधीं लाभायचा नाहीं! हृदयेश्वरा, तुझ्या त्रिलोकसुंदर मूर्तीचं ध्यान करांत या जगांतून मी नाहींशी होतांच, कुब्जा म्हणून कुणी प्राणी कधीं काळीं या भूतलावर होता कीं नाहीं, याबद्दल जगाला जशी पूर्ण विस्मृति पडेल, त्याप्रमाणं नाथा, तुलाही पडूं दे! कृष्णचंद्रा, या अभागिनीची फिरून तूं कधीं आठवणही करूं नकोस, इतकीच या दीन कुब्जेची तुला अखेरची विनंति आहे.

[ राग-झिंजोटी; ताल-केरवा; चाल-बैरन भइ निंदिया० ]

**जा विसरुनि सखया! मजला दयाळा! । दाहो न विकटा मम मूर्ति-नयनां । तव मृदुला मनाला! ॥ ध्रु० ॥ वरिं मरणाला हृदयीं धरोनी । प्रेमशिला विशाला ॥ १ ॥**

देवा, माझ्या कृष्णचंद्राला उदंड आयुष्य दे! [ डोहांत उडी टाकते.

[ पडदा पडतो. ]

# अंक पांचवा

## प्रवेश पहिला

[ अक्रूराच्या वाड्यांतील दिवाणखाना. नंद आणि यशोदा प्रवेश करतात. ]

**नंद**—देवि यशोदे, हाच आर्य अक्रूरांचा वाडा. आर्यांच्याच आश्रयाला आपलं बाळ कालपासून आहेत.

**यशोदा**—माझ्या बाळांचीं तीं सुंदर मुखकमलं या अभागिनीच्या पुनः दृष्टीला पडतील ना? नाथ, मनुष्याचं मन जितकं प्रेमातुर, तितकंच दैव क्रूर आणि हट्टी असतं!

**नंद**—देवि, अवघ्या तीनचार दिवसांच्या अवकाशांत तुझी काय शोचनीय स्थिति झाली ही! रामकृष्ण मथुरेला आल्यामुळं माझ्या राज्यनाशाची काळजी, जितकी मला वाटते, त्यापेक्षांही तुझ्या या करुणावस्थेनं माझ्या गृहराज्यासंबंधी मला अधिक भीति वाटते. देवि, काय हें? तुझ्या हृदयाचा भक्कम तट असा एकाएकीं पार भंगून कसा गेला?

[ राग-देशी; ताल-धीमा तिताला; चाल-म्हारे डेरे आवो० ]

**दाहो हृदया दीना दशा तव ही भ्रान्ता। नाशि जी मम गृह-**
**राज्या शांता॥ ध्रु०॥ उचित काय तुज शोकभीरुता। अस-**
**सि गुणरुचिरा वीर सुताची माता॥ १॥**

**यशोदा**—नाथ, प्रसंगीं ज्याचा विवेक टिकतो, तोच खरा विवेकशाली! विवेक हा पदार्थच मुळीं परमेश्वरानं स्त्रियांकरितां निर्माण केला नाहीं. कर्तव्यासाठीं कठोर होऊन, विवेकानं मायाममतेचा पाश झुगारून देणाऱ्या राधेसारख्या स्त्रिया सर्व स्त्रीजातीला केवळ अपवादरूप असतात, आणि म्हणूनच त्या जगाला वंदनीय होऊन रहातात. महाराज, कृष्णासारखा अलौकिक आत्मज्ञानी पुरुष माझ्यासारख्या सामान्य स्त्रीच्या उदरीं येणंच शक्य नव्हतं. पण तें आपणांला अगोदर कसं कळणार? नाहीं, नाथ, नाहीं; माझ्याच्यानं आतां धीर निघत नाहीं. सारं जग मला हंसू या; पण माझा कान्हा मला एक वेळ दाखवा. नाहीं तर हे प्राण चालले!

**नंद**—देवि, धीर धर; धीर धर. कालपासून आतांपर्यंत मीं तुला कसंबसं थोपवून धरलं. पण आज मी तुला मथुरेला घेऊन आलोंना ? दिसेल हो, तुझा कान्हा तुला दिसेल. परमेश्वर खास इतका कठोर नाहीं.

**यशोदा**—महाराज, आपण मला आज मथुरेला घेऊन आलां, त्यांत कृष्णदर्शनाचा आपला कांहींच का स्वार्थ नव्हता ? आम्ही स्त्रिया अगदीं भाबड्या ! दुःखानं हृदय पोळत असतां तें शांतच आहे, असं दाखविण्याची कला आम्हां बायकांना साधत नाहीं !

**नंद**—देवि, तुझ्यासारख्या हृदयवल्लभेपासून हृदयाच्या खऱ्या भावना लपवून ठेवण्यांत मला यश कसं येणार ? पण ते पहा, आर्य आलेच.

[ अक्रूर प्रवेश करतो. ]

**अक्रूर**( वंदन करून)—नंदमहाराज, आणि यशोदादेवि, आपल्या पुण्यचरणरजांनीं माझी गरीबाची झोंपडी पावन होऊन मी धन्य झालों ! उभयतां महाराजांनी जरा विश्रान्ति घ्यावी. तों स्नानभोजनादिकांची व्यवस्था—

**यशोदा**—अक्रूरजी, माझ्या रामकृष्णांच्या दर्शनाची अनिवार तहान आम्हांला लागली आहे. तिनं आमचे जीव व्याकुळ होऊन गेले आहेत हो ! तेवढं पाणी आम्हांला पाजून आमचे जीव वांचविण्याचं श्रेय घ्या.

**नंद**—अक्रूरजी, गोकुळाहून आम्ही स्नानभोजनादि कर्म आटोपूनच निघालों आहोंत. पण अगोदर मला सांगा, आमचे बाळ कुठं आहेत ?

**अक्रूर**—रामकृष्ण सकाळींच स्नानादिक कर्म आटोपून, थोडा फलाहार करून बाहेर पडले आहेत. आज राजमल्लांशीं त्यांचं बाहुयुद्ध होणार. आज कंसमहाराजांचा अर्धशतसंवत्सरसमारंभाचा शेवटचा दिवस. सारं मथुरानगर या वेळीं रंगमंडपाकडे लोटलं आहे. मी तिकडेच जायला निघालों होतों—

**यशोदा**—पण अक्रूरजी, मला आधीं सांगा, माझे बाळ कुशल आहेत ना ?

**अक्रूर**—कुशल आहेत-पूर्ण सुखरूप आहेत. आईसाहेब, आपल्या ईश्वरांश पुत्रांना कळिकाळापासूनही भय नाहीं. महाराज, रामकृष्णांनीं मथुरेंत पाऊल टाकल्यापासून त्यांच्या एकएक अद्भुत कृतींनीं सारी मथुरानगरी नुसती हलून गेली आहे ! काल सकाळींच दुष्ट कंसानं श्रीकृष्णावर मारेकरी घालण्याचा प्रयत्न केला; परंतु राधेच्या अपूर्व आत्मयज्ञामुळं तो विफल होऊन कंसाचीं बोटं त्याच्याच डोळ्यांत गेलीं ! रामकृष्णांच्या आगमनानं कंस आणि बोटांवर मोजण्याइतके त्याचे

कांहीं हस्तक यांच्याशिवाय मथुरेंतील एकूणएक स्त्रीपुरुष आनंदानं उत्फुल्ल होऊन गेले आहेत. रामराज्याची स्थापना करून श्रीकृष्ण पापी मथुरेला पुण्यरूप देणार, अशी प्रत्येकाच्या मनाची खात्री झाली आहे. ठिकठिकाणीं रामकृष्णांचं मंगल स्वागत होत आहे. त्यांचं दर्शन घेण्याकरितां नागरिक स्त्रीपुरुषांची नुसती खेंचाखेंच चालली आहे. काल रामकृष्णांनीं अनेक अद्भुत पराक्रम केले. कंसाच्या अनेक वीरांना लीलेनं यमसदनीं पाठवून श्रीकृष्णानं यागासाठीं पूजा केलेलं कंसाचं प्रचंड धनुष्य काडकन् मोडून टाकलं ! काल रात्रीं श्रीकृष्णानं कंसाच्या अत्याचारापासून राधेची ऐनवेळीं मुक्तता केली. त्याच्या या दैवी पराक्रमामुळं छाती हबकून जाऊन, कंसानं आज वसुदेव-देवकींची मुक्तता केली आहे.

**यशोदा**—देवा, माझ्या बाळांना नेहमीं असंच विजयी करून त्यांना उदंड आयुष्य दे—

**अक्रूर**—मर्जी असेल तर उभयतां सरकारांनीं रंगमंडपाकडे निघावं. युद्धाची वेळ झाली आहे-रथ तयार आहे.

**नंद**—चला. परमेश्वरा, तूंच आतां आमचा त्राता आहेस !

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा

[रंगमंडप. मध्यभागीं सुसज्जित आसनावर कंस बसला असून, सुनाम, चाणूर, मुष्टिक वगैरे त्याचे हस्तक जवळ उभे आहेत. वसुदेव, अक्रूर, सत्यक, दारुक, नंद, अंधक, अनय वगैरे सरदार आणि इतर सामान्य प्रेक्षक यांनीं रंगमंडप अगदीं खचून भरला आहे. दुसऱ्या बाजूला देवकी, यशोदा, राधा, चंद्रिका आणि इतर स्त्रिया बसल्या आहेत. पडदा उघडतांच "हें काय आश्चर्य!" "कुवलयापीड ठार झाला !-महात मेला ! शाबास-शाबास !" "धन्य श्रीकृष्ण ! धन्य राम !" इत्यादि आरोळ्यांनीं रंगमंडप गजबजून जातो. ]

**कंस**—काय, शेवटीं कुवलयापीडासारख्या अजिंक्य हत्तीला देखील कृष्णानं ठार केलं ? हा कर्मचांडाळ आहे तरी कोण ?

[ इतक्यांत "आले-वीर आले !" "रामकृष्णांचा विजय असो !" अशा

आरोळ्या चहूंकडे होतात. क्षणभरानें हातांत एकएक हत्तीचा अर्धचंद्राकार प्रचंड सुळा घेऊन रक्तमलिन मल्लवेषानें कृष्ण व बलराम प्रवेश करतात. ]

**कृष्ण**—अंधकादि गुरुजनहो, पूज्य प्रेक्षकवृंद, मातांनो, भगिनींनो, हे नम्र रामकृष्ण आपणां सर्वांना भक्तिपूर्वक वंदन करीत आहेत.

**अंधक**—रामकृष्णहो ! तुमचा सर्वदा विजय असो !

**कंस**—अरे दुष्टा !—

**कृष्ण**—गुरुजनहो, वयानं, अनुभवानं, ज्ञानानं, तपानं, वैभवानं माझ्याहून अत्यंत थोर असे आपण सर्वजण इथं जमलां आहां. आपण सारे सुज्ञ आहां. न्यायान्याय, पापपुण्य यांचा योग्य विचार करण्याचं सामर्थ्य आपल्या ठिकाणीं पूर्ण असून आपण निःपक्षपातानं आणि निःस्पृहतेनं, नीति-अनीतीचा निर्णय द्याल, यांत संशय नाहीं. पांचामुखीं परमेश्वर या न्यायानं आपणां सर्वांच्या ठिकाणीं माझी परमेश्वरतुल्य श्रद्धा असल्यामुळं मी आपणांसमोर या कंसाविरुद्ध फिर्याद मांडणार आहें. तिचा आपण योग्य निर्णय करा.

**कंस**—कृष्णा, हा रंगमंडप म्हणजे न्यायमंदिर नव्हे, आणि अंधकादि भकलेल्या थेरड्यांकडे जगाचा न्याय करण्याचं कामही परमेश्वरानं सोपविलं नाहीं. ज्यासाठीं तुला आम्ही मुद्दाम मथुरेला पाचारण केलं, तो बाहुयुद्धाचा समारंभ या वेळीं व्हायचा असून त्यासाठींच इतके असंख्य प्रेक्षक रंगमंडपांत लोटले आहेत. न्यायाचं भलतंच नाटक या वेळीं तुला इथं कुणीही करूं देणार नाहीं. आणि माझ्यासारख्या सिंहासनाभिषिक्त राजाचा न्याय करण्याचा अधिकार कुणालाच नाहीं.

**कृष्ण**—कंसा, तुझ्या या कमकुवत शब्दांचा पोकळ जोरच सांगतो आहे, कीं तुझे हे सारे सिद्धांत चुकले आहेत ! तुझा आणि मथुरेच्या सिंहासनाचा काय संबंध? मथुरेच्या सिंहासनाचा न्याय्य अधिकार उग्रसेनमहाराजांकडे असून आम्ही सर्व त्यांचे एकनिष्ठ प्रजाजन आहों. कुणाचाही न्याय करण्याचा अधिकार या अनंतमुखी परमेश्वरलो आहे. माझी फिर्याद या परमेश्वरासमोर मी मांडणार असून तो देईल तो न्याय मला मान्य आहे.

**कंस**—तुला शिळपटाला वाटेल तें मान्य होईल ! कृष्णा, अधिक पंचाइतीची जरूर नाहीं. ठरलेल्या कार्यक्रमाशिवाय दुसरी कोणतीही गोष्ट तुला आम्ही करूं देणार नाहीं. हें जर तुला मान्य नसेल, तर मुकाट्यानं चालता हो ! माझ्या या चाणूर-मुष्टिकादि राजमल्लांसमोर भीतीनं तूं पळ काढलास, असा न्याय देऊन, आम्ही दुस-

गाडून टाकतों!

**कृष्ण** ( एकदम चवताळून सिंहासनावर उडी मारतो. )—अधमा! माझ्या पूज्य गुरुजनांची कानांनीं ऐकूं नये, अशी निंदा माझ्यासमोर? तुझ्या पापांचा घडा या क्षणीं पुरता भरला! या पापाला मात्र क्षमा नाहीं! भोग आपल्या पापांचीं फळं!

**कंस**—ये, ये! या वज्रमुष्टीच्या प्रहारानं तुला ठार करून माझी प्रतिज्ञा याच क्षणीं मी पूर्ण करतों!

[ कृष्ण कंसाला सिंहासनावरून ओढतो. त्या उभयतांचें युद्ध होतें. शेवटीं वज्रमुष्टि छातींत मारून कृष्ण कंसाला ठार करतो.]

**कृष्ण**—पापी अन्याय कितीहि वर चढला, तरी शेवटीं न्यायी परमेश्वर त्याचा असा अधःपात करतोच! [ "श्रीकृष्णाचा विजय असो!" असा जयध्वनि सर्वत्र होतो. ]

**राधा** ( पुढें होऊन )—श्रीकृष्णा, धन्य! त्रिवार धन्य आहेस तूं!

**कृष्ण** (वंदन करून)—राधामाई, ही सारी तुझी कृपा! दादा, तुम्ही आधी उग्रसेनमहाराजांच्या मुक्ततेची व्यवस्था करा. ( बलराम जातो.) ( वसुदेव-देवकींना वंदन करून) बाबा, आई, सतरा वर्षं तुम्हांला अनंत यातना भोगायला लावणाऱ्या या अधम कृष्णाला, 'क्षमा करा' असं म्हणायला तोंडच नाहीं!

**वसुदेव व देवकी**—बाळा, कंठ दाटून आल्यामुळं आम्हांला बोलवत नाहीं. पण तुझं तोंड आम्ही असं बंद करून टाकतो! (दोघें दोन बाजूंनीं चुंबन घेतात. ) बाळा, देव तुला मार्कंडेयाचं आयुष्य देईल!

**कृष्ण** ( नंद व यशोदा यांना वंदन करून )—आई, बाबा, या अपराधी बाळाचे सर्व अपराध क्षमा करून त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करायला आपल्याशिवाय कोण समर्थ आहे?

**नंद**—बाळा, तुझ्या असल्या पुण्यप्रमादांमुळंच जगाचा उद्धार होणार आहे! म्हणून तुझ्या हातून वारंवार असेच पुण्यप्रमाद होतील, असा मी तुला आशीर्वाद देतों.

**यशोदा**—कान्ह्या, तुझ्यासारख्या अवतारी परमेश्वराला मी सामान्य स्त्री कोणता आशीर्वाद देऊं?

**कृष्ण**—आई, मला हाच आशीर्वाद दे, कीं मोठेपणाची जाणीव मला कधीं-

ही न होवो! आई, मी कितीही मोठा झालों, तरी तुझा! आणि साऱ्या गोप-गोपींचा मी गोकुळचा कान्हाच!

**राधा**— श्रीकृष्णा, जगन्मंगलाच्या दिव्य प्रासादाचा तूं पाया घातलास, हें पाहून सर्व विश्वाला आनंदाच्या उकळया फुटत आहेत! सांग, परमेश्वरानं तुझं आणखीं काय प्रिय करावं ?

**कृष्ण**—गुरो राधामाई, जगत्कल्याणाशिवाय मला जगांत दुसरी कसलीच इच्छा नाहीं. तेव्हां तें माझ्या हातून कांहीं तरी पार पडावं, एवढाच आपणां सर्व गुरुजनरूप परमेश्वराचा मला आशीर्वाद असावा.

**राधा**—तथास्तु. जगद्हित कृष्ण या नांवानं तूं कल्पांतापर्यंत ओळखला जाशील!

[ राग–बिभास; ताल–झपताल; चाल–गंगे त्रिपुर० ]

**केला पुण्यविजय प्रभुनें परम सदय । तव करीं अन्यायगुरु-पाप निवारोनि ॥ ध्रु० ॥ शिव-मंगलासि आचंद्रार्क झटतील तव या दुःखतरणि अवतारकृति जनीं ॥ १ ॥**

[ पडदा पडतो. ]

---

**समाप्त.**

**नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च ।**
**जगद्-हिताय कृष्णाय गोविन्दाय नमो नमः ॥**

---